सहविचारिणी सभेची ग्रंथमाला.

( पुस्तक ३ रें. )

# समाजसुधारणेच्या कित्येक बाजू.



हें पुस्तक

मुंबई येथें 'वर्तमान तत्वदर्शक' छापखान्यांत छापिलें.

प्रती २,०००.

संवत १९५०. सन १८९४.

किंमत रु. १.

# प्रस्तावना.

कोणताही देश भरभराटीस येण्यास त्याची अंतःस्थिति सुधारणें अत्यंत अवश्य असतें, व जी सुधारणा व्हावयाची ती एक देशापुरतीच होण्यापेक्षां सर्वत्र व्यापक होणें हें अतिशय महत्वाचें असतें, ह्या गोष्टी येथें नव्यानें सांगितल्या पाहिजेत असें नाहीं. राजकीय सुधारणा, नैतिक सुधारणा, सांपत्तिक सुधारणा, इत्यादि अनेक प्रकारच्या सुधारणा आहेत, व त्या प्रत्येकीं अन्योन्यावलंबी असून त्यांमध्येंच सामाजिक सुधारणाही निविष्ट होते. इतर सुधारणा ज्या प्रमाणानें महत्वाच्या आहेत, त्याच प्रमाणानें ही सुधारणाही महत्वाची आहे. या सुधारणेचा विचार करितांना शेंकडो निरनिराळ्या गोष्टींचा विचार होणें अगत्याचें आहे; व तसा विचार क्रमाक्रमानें करण्याचा या सभेचा हेतु आहे. प्रस्तुतचे प्रसंगीं [ १ ] **नव्यविचारप्रचार**, [ २ ] **नौकानयन**, [ ३ ] **लीक्लेअरचरित्र**, व [ ४ ] **ऋणनिषेध** या चार सदरांखालीं समाजसुधारणेच्या कित्येक बाजू दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

प्रस्तुतकाळच्या जीवनकलहांत आर्यराष्ट्र कित्येक पाश्चात्य राष्ट्रांच्या पाठीमागें पडून राहिलें आहे, ती स्थिति जाऊन आपणास त्या राष्ट्रांची बरोबरी करितां येण्यास ज्या अनेक नवीन गोष्टी प्रचारांत आणणें आवश्यक आहे, त्या प्रचारांत येण्यास अडचणी कोणत्या, व त्यांचें निवारण कशा रीतीनें होऊं शकेल, हें सुचविण्याचा **पहिल्या** लेखाचा उद्देश असून, '**नव्यविचार**' ( Innovation ) या विषयावरील लॉर्ड **बेकन** यांचा निबंध व त्यांचें **व्हेटली** नामक प्रसिद्ध ग्रंथकारानें केलेलें स्पष्टीकरण या दोहोंचा प्रस्तुतच्या लेखास आधार घेतला आहे, व त्याचा आर्यजनांस वास्तविक उपयोग होण्याकरितां या देशांतील अनेक उदाहरणें जागोजागीं निविष्ट केलीं आहेत. दुसऱ्या लेखांत **नौकानयना**ची कला ( Navigation ) पाश्चात्य देशांत वाढण्याचीं व या देशांत **न** वाढण्याचीं कारणें, सांप्रतकाळीं हिंदुस्थानास या कलेची आवश्यकता व तिजपासून होणारे लाभ, त्या कलेचा प्रसार करण्याचे उपाय, इत्यादि विषयांचें बऱ्याच विस्तारानें

प्रतिपादन केलें आहे. तिसरा लेख सहकार्यकरण ( Co-operation अथवा जुटीनें कामें करणें यासंबंधाचा आहे. लेखाचा नायक **लीक्लेअर** हा एक प्रसिद्ध **फ्रेंच** गृहस्थ असून, तो अतिशय गरीब स्थिती पासून श्रीमंत कसा झाला, त्यानें सहकार्यकरणासंबंधानें कोणत्या गोष्टी केल्या, त्या सिद्धीस कशा नेल्या, सहकार्यकरणाप्रीत्यर्थ त्यानें स्वहितत्याग करून आपल्या अनुयायांस काय काय उपदेश केले, व **लीक्लेअरच्या** एकंदर चरित्रापासून आमच्या लोकांनीं कोणता उपदेश घेण्याजोगा आहे इत्यादि विषय या लेखांत आहेत. शेंवटच्या ह्मणजे चौथ्या लेखांत ऋण करण्याची आपले लोकांची घातुक संवय, ही संवय घालविण्याचे उपाय, ऋणमुक्त असल्यापासून होणारे फायदे, ऋणमुक्त होण्याचे मार्ग,इत्यादि विषयांचें प्रतिपादन केलें आहे. चारी लेखांत निरनिराळ्या गृहस्थांनीं जे निरनिराळे विचार प्रकट केले आहेत, ते सर्वमान्य असले पाहिजेत असा या सभेचा आग्रह नाहीं; व कोणाचे कितीही मतभेद असले, तरी ते लेखरूपानें प्रकट होणें, व त्यांची सर्वत्र चर्चा होणें ह्या गोष्टी अत्यंत अगत्याच्या आहेत असा सभेचा अभिप्राय असल्यामुळें, तशी चर्चा होण्यास कांहीं तरी पूर्वकारण असावें एवढ्याच उद्देशानें प्रस्तुतचे लेख प्रसिद्ध करण्यांत येत आहेत..

सहकार्यकरण अथवा ( Co-operation ) या विषयाच्या संबंधनें **लीक्लेअर**चरित्राचा अनुवाद करून खालीं सही करणारां पैकीं रा. रा. **शंकर मोरो रानडे** यांनीं कीर्तन केलें होतें, व तें या पुस्तकांत संगृहीत करण्याचा सभेचा मूळ उद्देश होता; परंतु त्यांनीं दुसऱ्या अनेक विषयांवर कीर्तनें केलीं असून तीं सर्व निराळ्या पुस्तकाच्या रूपानें प्रसिद्ध होण्याचें ठरल्यामुळें, हें कीर्तन या पुस्तकांत घातलें नाहीं.

**बडोदें,**
तारीख ३०–९–९४.

**शंकर मोरो रानडे,** बी. ए.,
**भानु केशव गांगनाईक,**
सहविचारिणी सभेचे चिटणीस

# अनुक्रमणिका.

पृष्ठांक.

# समाजसुधारणेच्या कित्येक बाजू.

## ( १ ) नव्यविचारप्रचार.

बेकननें " कालच नवीन फेरफार करितो " असा जो उल्लेख केला आहे, त्याचा अर्थ वाक्यांतील शब्दांप्रमाणेंच त्याचे मनांत होता, असें ह्मणतां येत नाहीं. वास्तविक पाहतां सर्वत्र जीं कार्यें होतात त्यांमध्यें कालाचें कर्तृत्व लेशमात्रही नसतें; इतकेंच नव्हे, पण काल हा निराळा पदार्थच नाहीं असें सुद्धां ह्मणतां येईल. लोकांत ' कालानें हा फेरफार झाला ' इत्यादि वाक्यें आपण ऐकतों, त्या वाक्यांच्या शब्दांवरून फेरफाराचें कर्तृत्व कालाकडे आहे असा जरी आपणास भास होतो, तरी पण तत्वतः तसें नसून, त्या फेरफारास प्रवर्तक अत्यंत सूक्ष्म व दुर्ज्ञेय अशीं जीं कारणें असतात, त्यांबद्दलच आपण व्यवहारांत काल-शब्दाचा प्रयोग करितों. कारण खऱ्या कर्तृत्वाच्या संबंधानें ह्मटलें, तर दुसरीं कांहीं सहकारी कारणें असल्यावांचून नुसत्या कालाकडून हजारों वर्षांत सुद्धां कांहीं एक व्हावयाचें नाहीं. मोठे मोठे विद्वान व बुद्धिमान लोक सुद्धां " अमक्या देशांत राज्यव्यवस्थेंत जो फेरफार झाला तो एकदम झाला असें नाहीं, तर कालानें क्रमाक्रमानें झाला " असें ह्मणतात. परंतु जो फेरफार झाला तो कालानें झाला असें नव्हे, तर त्या फेरफारास अनेक मानवकृतिच कारण झाल्या, हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं.

" नवीन फेरफार हे परक्या मनुष्यांप्रमाणें असतात, ह्मणजे जरी ते लोकांत वाखाणले जातात, तरी पण लोकांना ते मनापासून आवडत नाहींत. "

निरनिराळ्या भाषांमध्यें "ज्या गोष्टी मनुष्यांच्या अंगवळणीं पडून गेल्या असतात, त्यांना ते अगदीं चिकटून राहतात"; "संवय ही दुसरा स्वभावच होय"; "ज्या गोष्टी व संस्था एकाद्या मनुष्याच्या अंगवळणीं पडून गेल्या, त्या तो मोठ्या प्रेमानें धरून बसतो. त्यांच्यामध्यें त्यापेक्षां विशेष सोईचे व हितावह जरी फेरफार सिद्ध करून दाखविले, तरी त्यांमध्यें फेरफार करण्याविषयीं त्यांचें मन कष्टानेंही वळवितां येत नाहीं;" इत्यादि अर्थद्योतक अनेक म्हणी आहेत. तसेंच यांच्या विरुद्ध अशा ही म्हणी आहेत कीं, "मनुष्याच्या मनाची स्वभावतः नवीन गोष्टीकडे विशेष धांव असते"; "अनेक कालपर्यंत कोणत्याही प्रकारच्या फेरफारावांचून नेहमी तेंच तें घेऊन बसणें त्यांना कंटाळवाणें वाटतें"; "ठरींव रिवाजांमध्यें किंवा पद्धतींमध्यें कांहीं तरी फेरफार किंवा बदल त्यांना हवा असतो; या बदलाविषयीं त्यांचा इतका अभिनिवेश असतो कीं, तो कोणताही आणि कसाही कां होईना, त्याचे परिणाम जरी अनिष्ट असले तरी बेहेत्तर, पण फेरफार व्हावा असें त्यांना वाटत असतें."

वर ज्या दोन प्रकारच्या समजुतीच्या म्हणी सांगितल्या, त्यांवरून वर वर पाहणारास त्या उभयतांमध्यें अत्यंत विरुद्धार्थाचें प्रतिपादन आहे असें वाटेल, पण बारीक विचार करून पहातां या म्हणींची एकवाक्यता करितां येण्याजोगी आहे. आयुष्यामधील अति महत्वाच्या व विशेष विचारणीय ज्या गोष्टी आहेत, त्यांमध्यें ज्या गोष्टी मनुष्याच्या अंगवळणीं पडून गेल्या आहेत, त्यांलाच ते चिकटून रहातात, आणि केवळ शोभेखातर अगर भूषणावह ज्या गोष्टी असतात, त्यांत त्यांना फेरफार करावासा वाटतो.

सर्व प्रकारच्या पद्धति व संस्था आणि आयुष्यांतील सामान्य गोष्टी यांमध्यें मनुष्यांना ठरींव रिवाजाप्रमाणें चालणें आवडतें. या प्रकरणां-

पैकीं विशेष गोष्टींमध्यें किंवा दुसऱ्या साधारण वरवरच्या बाबतींमध्यें मनुष्यांना फेरफार असावासा वाटतो. ज्याप्रमाणें झाडाचे बुंधे व शाखा हीं वर्षोंवर्ष तींच असतात, परंतु पालवी मात्र दर वर्षास निरनिराळी येते, त्याप्रमाणेंच वरील गोष्टींचें होय.

निरनिराळ्या देशांत लोकांना पोशाखामध्यें व सामानामध्यें वैचित्र्य असावेंसें वाटतें. गाणें, कविता, चित्रें, फुलें, काव्यें, खेळ वगैरेंमध्यें निरनिराळे नवेनवे फेरफार त्यांना असावेसे वाटतात. परंतु ठरींव कायदे, पद्धति, संस्था आणि आयुष्यांतील वर्तनाच्या मुख्य गोष्टी यांमध्यें ठरींव रिवाजालाच ते चिकटून रहातात.

उदाहरणार्थ, आपला वैदिक धर्मच घेतला तरी चालेल. अति प्राचीन काळापासून **भरतखंडांत** वैदिक धर्म चालू आहे. **भरतखंडांत** वैदिक धर्माखालीं हजारों पंथ मोडले जातात. त्यांतील अगदीं ठळक मोठमोठाले पंथ तर द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत व वल्लभ हे होत. आतां या निरनिराळ्या संप्रदायांमध्यें जरी अनेक मतभेद आहेत, तरी पण श्रुति, स्मृति, पुराणें हीं प्रमाण आहेत असें सर्वजण मानितात. वैष्णवांमध्यें हजारों भेद आहेत, व त्यांच्यामध्यें अनेक फेरफार झाले आहेत, परंतु जीवेश्वरभेद, **नारायण, राम, कृष्ण** इत्यादिकांविषयीं ईश्वरबुद्धि या बाबती कोणीं सोडिल्या नाहींत. **भरतखंडां**तील निरनिराळ्या शेंकडों हजारों ब्राह्मण जातिच घ्याना; वेद, सूत्रें हे सर्वांचे आद्य ग्रंथ असें असून, त्यांच्या आचारविचारांमध्यें प्राचीन कालापासून हजारों फेरफार होत आले आहेत; परंतु उपनयन, विवाह, गायत्रीजप, पंचमहायज्ञादि मुख्य मुख्य व सामान्य गोष्टी कोणीं सोडिल्या नाहींत. **ख्रिस्ती** व **मुसलमानी** धर्माचीही अशीच गोष्ट आहे. जरी **बैबल** व **कुराण** झाल्यापासून शेंकडों पंथवाल्यांनीं अनेक फेरफार केले आहेत, तरी पण

त्या त्या धर्माच्या ज्या सामान्य गोष्टी आहेत त्यांमध्यें लोकांकडून फेरफार झाला नाहीं.

आपल्या देशांत बुद्धधर्माचा चिरस्थायी स्वतंत्र प्रसार झाला नाहीं, याचें कारण हेंच कीं, त्यांनीं वेदाच्या प्रामाण्यास लाथ मारून आपलीं नवीन मतें प्रतिपादन करण्यास आरंभ केला. तेव्हां अर्थातच आपल्या सनातन जुन्या धर्माचा सर्वस्वीं त्याग करून या नव्या धर्मांत शिरणें लोकांस कसें आवडेल ? आवडणार नाहीं, हें उघडच आहे. तात्पर्य, याच कारणामुळें लोकव्यवहारानभिज्ञ प्रथम बुद्धधर्मोपदेशकांची ब्राह्मणवर्गीतील पुष्कळ लोकांत डाळ न शिजतां त्यांना खालच्या जाति किंवा चीनादि इतर देश यांजकडे मोरचा फिरवावा लागला. आतां बुद्धाच्या सुधारणा व्यवहाराभिज्ञ व्यासादि महर्षींनीं कशा अमलांत आणिल्या, पहा. व्यासादि जे महर्षि किंवा मोठमोठे विद्वान होते, त्यांनीं, वेदाचें प्रामाण्य ठाम बसलें होतें त्याचें समुन्मूलन होणें अशक्य आहे असें समजून, वेदालाच प्रमाण मानून वेदाचे विचार घेऊन त्यांला आपले विचार जोडिले, तेव्हां त्यांचे ग्रंथ लोकमान्य झाले, व त्या मतांचा लोकांत प्रसार झाला, व तींच बुद्धादिकांची अहिंसादि मतें सामान्य जनांत पसरलीं. तात्पर्य, खऱ्या सुधारकांनीं, जुन्या ग्रंथांच्या प्रामाण्याला लाथ मारून नवीन मतें प्रतिपादन करण्यापेक्षां, जुनें धरून त्यांची व्यवस्था करून त्यांत नवें मिसळावें, म्हणजे तें मिश्रण बेमालूम होतें. त्याला दुसरें एक उदाहरण आहे.

"न शुद्राय मतिं दद्यात्। नचास्योपदिशेद् धर्मम्" (शूद्राला ज्ञान देऊं नये; शूद्राला धर्मोपदेश करूं नये) इत्यादि मतें स्मृतिग्रंथांत आहेत. विद्वानांना, पौराणिकांना व अनेक महर्षींना तीं मतें आवडेनात, परंतु करायाचें काय? हीं मतें बदलावींत कशीं? ज्या स्मृतिग्रंथामध्यें तीं

वाक्यें आहेत, ते स्मृतिग्रंथ अप्रमाण मानावेत काय? नाहीं, हें उघडच आहे. तेव्हां समंजस लोकांनीं तेच स्मृतिग्रंथ प्रमाण मानून मति शब्दाचा अर्थ वेदाक्षरपूर्वक त्याच्या अर्थाचें ज्ञान, व धर्म ह्मणजे यज्ञादि क्रिया, अशी व्यवस्था लाविली; आणि मूळ कायम ठेवून त्यांनीं शूद्रांसाठीं ग्रंथ व धर्म रचिले, व जुने लोकांचें समाधान करून त्यांचा प्रचार केला. व हाच कित्ता रामदास, एकनाथ, ज्ञानदेव, तुकारामादि मोठमोठ्या संत मंडळींनीं घेऊन आचांडालांत अध्यात्मज्ञानाचा प्रसार केला. तात्पर्य, मूळ कायम ठेवून फेरफार केला असतां तो लोकसंमत होतो. मूळांतच फेरफार केला, तर लवकर लोकमान्य होत नाहीं. याला आणखी एक उदाहरण; बडोदें, इंदूर, ग्वाल्हेर येथील सर्व दक्षिणी ब्राह्मण मूळचे दक्षिणेस राहणारे, तेव्हां अर्थात्च त्या सर्वांची जुनी दक्षिणेची पागोट्यांची पद्धति एकच; तींत पुढें, बाबाशाई, ग्वाल्हेरशाई, इंदूरशाई असे फेरफार झाले. पण त्यांत सामान्य गोष्टी बदलल्या काय? मुळींच नाहींत. केळें, कोकी, पीळ, हीं सर्वांची जवळ जवळ सारखींच, पण बाह्य आकारांत मात्र फेरफार. असो.

केवळ धार्मिक बाबतींत असें आहे, असें नाहीं. जगांत ज्या निरनिराळ्या पद्धति आहेत, त्यांमध्यें सुद्धां असेंच आहे. जगामध्यें निरनिराळ्या रोगांवर ज्या निरनिराळ्या औषधि आहेत, त्यांत नेहमीं बदल होतात; परंतु त्याबद्दल एवढा सुद्धां अडथळा झाला नाहीं. पण तीच वैद्यकाचे शास्त्रपद्धतींत फेरफार होण्याची वेळ येऊं द्या, ह्मणजे लोकांत किती विरुद्धता येते, पहा. व्यवहारांत नेहमी निरनिराळीं औषधें निरनिराळ्या रोगांवर निवत आहेत, व लोक हे फेरफार निमुटपणें ग्रहण करीत आहेत, तेव्हां आपण जो नवीन शोध लाविला आहे तोही लोक दुराग्रह टाकून ग्रहण करितील असें प्रसिद्ध डॉक्तर हार्वे यांस साहजिक वाटलें असेल. परंतु रुधिराभिसरणाचा नवीन शोध त्यांनीं

लाविल्याबरोबर वैद्यशास्त्रपद्धतींत जो मूळाशींच फेरफार झाला, त्यायोगानें त्या वेळच्या वैद्यशास्त्राभिज्ञांमध्यें जी विलक्षण चळवळ झाली, व खंडनादिद्वारें त्यांनीं त्यांच्याशीं जो विरोध आरंभिला, तें पाहून त्यांला खरोखर आपलें अनुमान चुकीचें होतें हें कळलें असेल.

ज्योतिःशास्त्रांत सुद्धां निरनिराळ्या ग्रहांचे शोध लाविले, किंवा कांहीं ग्रहांच्या गतींमधील फेरफारांचे शोध लागले, तर त्याबद्दल विद्वानांत फारशी वाच्यता होत नाहीं; पण शास्त्रपद्धतींतच जर बदल व्हावयाची वेळ आली, तर मात्र ते आकाशपाताळ एक करून सोडितील. **कोपर्निकस, ग्यालिलिओ** वगैरे ज्योतिर्विदांनीं जेव्हां शास्त्रपद्धतींत फेरफार केले, तेव्हां लोकांनीं त्यांचे छळ केले, त्यांतलें इंगित वरील सिद्धांतच आहे.

जेव्हां कोणी शोधक ठरींव पद्धतींत फेरफार करूं इच्छितो, तेव्हां मोठमोठे तत्वपंडितही त्याच्याशीं विरोध करण्यास चुकत नाहींत. डा. **हार्वे** यांनीं जेव्हां रुधिराभिसरणाचा शोध लाविला, तेव्हां ज्या वैद्यशास्त्रज्ञांनीं त्यांशीं अत्यंत विरोध केला, त्यांमध्यें महान वैद्यशास्त्राभिज्ञ पंडित होते. तसेंच ज्या लोकांनीं **कोलंबसा**च्या विचाराशीं अत्यंत विरुद्धता दाखविली, तेही महानौकलाभिज्ञ होते.

‘ पेनी पोस्टेज ’ ची जी सर्वत्र सुधारणा झाली, तिच्या आरंभीं जे या विचाराच्या विरुद्ध होते, ते सर्व ‘ पोस्ट ऑफिस ’ च्या कामामध्यें निपुण होते. आगगाडी एका तासांत १२ मैल जाईल, असें **जॉर्ज स्टीफेन्सन्** बोले, तेव्हां ज्यांनीं त्याच्या बोलण्याचा अत्यंत उपहास करावा, ते महान् प्रसिद्ध शिल्पकलाभिज्ञ होते. यावरून असें सिद्ध होतें कीं, कोणत्याही धंद्यांत अगर व्यवसायांत अगर विद्येंत जे महानिपुण असतात, त्यांना सुद्धां साधारण बाबतींत जर कांहीं सुधारणा

किंवा फेरफार असेल, तर मात्र रुचतो; पण जर एकादी नवीन अत्यपूर्व कल्पना कोणीं सुचविली, तर ती त्यांच्यानें नुसती शांतपणानें ऐकून सुद्धां घेववत नाहीं, मग ती ऐकून विचार करण्याची गोष्ट कशास पाहिजे? उदाहरणार्थ, एकाद्या गाडीवानाला गाडीच्या चाकासंबंधानें किंवा रस्त्यासंबंधानें कांहीं सुधारणा सुचविल्या, तर तो त्या मोठ्या आनंदानें ऐकेल; परंतु तेंच तुह्मी त्याला रेलवेची कल्पना किंवा वाफेच्या गाडीची कल्पना सांगा कीं, तो तेव्हांच गांगरून जाईल, व ती त्याच्या डोक्यांत कधींही शिरावयाची नाहीं. शेतकरी लोकांना, त्यांच्या परंपरागत कृषिकर्मपद्धतींत ज्या चुका आहेत, त्या अगदीं स्पष्टपणें दाखविल्या, तरी नवीन पद्धतीचा स्वीकार करणें त्यांना किती कष्टप्रद वाटतें, हें अनेक वेळां अनेक विद्वानांच्या अनुभवास आलेंच असेल.

आयुष्यामधील अनेक बाबतींत, राज्यतंत्रांत, आणि कायदे करण्याच्या बाबतींत मनुष्यें पुष्कळ वेळां आपलेंच वळण गिरवीत बसतात, याविषयीं एका ग्रंथकारानें पुढील चमत्कारिक गोष्ट लिहिली आहे:—

"व्यवहारामध्यें कोणती एकादी नवीन सुधारणा करण्याविषयीं सूचना केली, तर तिजवर कित्येक लोकांचा असा आक्षेप असतो कीं, या नवीन सुधारणेपासून किती अनिष्टें उत्पन्न होतील, याचा कोणीं विचार केला काय? सकृद्दर्शनी या आक्षेपांत कांहीं तात्पर्य नाहीं अशी आपली अगदीं खात्री होऊन जाईल; कारण नवीन सुधारणेपासून जीं भावी अरिष्टें उत्पन्न होणार ह्मणून भ्यावयाचें, तींच अरिष्टें परंपरागन गोष्टींत सुद्धां खिळून बसलेलीं असतातच. मात्र भेद इतकाच कीं, जी जुनी गोष्ट प्रचारांत येऊन गेली आहे, तिजमध्यें वाटेल तितके अनर्थ असले, तरी त्या अनर्थाचें बीज त्या गोष्टीमध्येंच आहे असें

न समजतां, त्या अनर्थाची उपपत्ति लोक कांहीं तरी अन्य प्रकारें करितात; किंवा त्या गोष्टीपासून ते अनर्थ झाले असले, तरी तिकडे कानाडोळा करितात; अथवा मनुष्यानें कितीही यत्न केले, वाटेल तेवढे शोध लाविले, तरी मनुष्यमात्र दुःखांत मग्न असणारच, त्या दुःखापासून सर्वोपरि सुटका होण्याचा मार्गच नाहीं, इत्यादि सदरामध्यें त्या अनर्थांचा समावेश करितात." या सर्वांचें कारण काय तर उघडच आहे कीं, त्या गोष्टी अनेक वर्षांपासून हाडीं खिळून गेल्या कारणानें त्यांपासून होणाऱ्या अनर्थांचें मनुष्यांना भानच होत नाहीं. याला उदाहरण. बडोदें शहरामध्यें १५–२० वर्षांपूर्वी रस्ते अगदीं गलिच्छ होते, जागोजागीं घाणेरडें पाणी सांचत असे. तात्पर्य, शहरामध्यें पुष्कळ ठिकाणीं स्वच्छतेचा इतका अभाव होता कीं, त्यामुळें रोगराई उत्पन्न होत असे, व अनेक प्राणी काळाच्या मुखीं पडत. अशी वास्तविक स्थिति होती, तरी ती स्थिति फार वाईट होती व निंद्य होती, असें त्या वेळच्या लोकांस वाटत नसे; परंतु तेंच आतां नवीन पाणी आल्यापासून जर एकाद्या वेळेस गांवांत ताप वगैरे आले तर, मात्र लोक नवीन पाण्याच्या नांवानें खडे फोडतील.

सुधारलेले समाज दासविरहित राहूं शकतील, याची कल्पना सुद्धां प्राचीन रोमन लोकांना नव्हती. वास्तविक पहातां दास्यपद्धतीपासून त्यांचा जितका फायदा होत होता असें त्यांस वाटत होतें, तितकाच फायदा दास्यपद्धतीचा अंगीकार न करितां, मनुष्यमात्रांस स्वातंत्र्य देऊन त्यांनां मजुरी देऊन त्यांच्या खुषीनें त्यांच्याकडून काम करून घेतलें असतांही, करून घेतां आला असता. इतकेंच नव्हे, तर या दास्यपद्धतींतच आपल्या राष्ट्राच्या नाशाचें बीज आहे, ही गोष्ट दास्यपद्धति त्यांच्या अंगीं खिळून गेल्या कारणानें त्यांच्या लक्षांत आली नाहीं. कोणी एका मराठे सरदारानें एके दिवशीं एका सभ्य इंग्रजाला

प्रश्न केला कीं, " कांहो, लुटण्याला तर तुह्मी परवानगी देत नाहीं, आणि इकडे पाहावें तों जय्यत फौजा तुम्ही समरांगणामध्यें आणितां, तर हें कसें असतें ? " ज्या मराठे सरदारानें हा प्रश्न केला, त्यानें आपल्या वाड-वडिलांच्या वेळीं मराठी फौज लुटालूट करितांना पाहिली असेल, तेव्हां अर्थात्च लुटण्यापासून वसुलासंबंधांत राज्याचें काय नुकसान आहे, व लुटालूट केल्यानें किती अनर्थ होतात, व लूट न करितांही मोठमोठ्या फौजा जय्यत राखितां येतात, याची कल्पना सुद्धां त्याच्या मनात नव्हती.

" कांहो, तुमच्या मुलाला ताप आला असतांना त्याला अगदीं अं-धारकोठडींत दारें लावून हवा व उजेड बंद करून कां ठेवितां ? अहो, त्याला उजेडांत आणा. हवा खोलींत येण्यासाठीं खिडक्या उघड्या ठेवा, ह्मणजे त्या मुलाला बरें वाटेल " असें एकाद्या सामान्य मनुष्याला ह्मटलें, तरी तो त्याचा एकच जबाब देईल. तो हा कीं, " आह्मीं आजपर्यंत अनेक वेळां अशा प्रसंगीं असें केलें आहे, पण त्यापासून इजा बिलकूल झाली नाहीं. " कोणतीही एकादी नवीन सुधारणा हितप्रद आहे कीं नाहीं याची जेव्हां आपण प्रचिती पाहूं लागतों, तेव्हां त्या सुधारणेंत कांहीं व्यंगें असलीं तर तीं मात्र पुढें येतात. कित्येक वेळां त्या सुधारणेपासून होणाऱ्या भावी अनर्थाचें अतिशयोक्तिरूपानें वर्णन होतें. परंतु तितक्याच किंबहुना त्याहूनही अधिक अडचणी परंपरागत गोष्टींत असतात, पण त्या गोष्टी अंगाला खिळून गेल्यामुळें त्या अडचणींचें भान होत नाहीं.

ठरींव पद्धतीमध्यें फेरफार करूं इच्छिणाऱ्या लोकांना वर ज्या अड-चणी सांगितल्या, त्यांमध्यें दुसरी एक अडचण आहे ती अशी कीं, नवीन पद्धति सुरू करतांना, साहजिक अन्य कारणानें का होईना,

एकादें अरिष्ट उद्भवलें, किंवा अनर्थ झाला, तर सामान्य लोक लागलेंच "पहा अमक्या मनुष्यानें ठरींव पद्धति सोडून अमक्या रीतीचें आचरण केलें, ह्मणून हा भयंकर परिणाम झाला," असें बोलूं लागतात; आणि ठरींव पद्धतीप्रमाणें कांहीं काम चाललें असतां जर तेंच अरिष्ट किंवा तोच अनर्थ झाला, तर यथाकथंचित् कांहीं तरी निमित्तांतर करून त्यावर तो अनर्थ ढकलितात. उदाहरण, सन्निपातज्वरामध्यें जुने वैद्य नानातऱ्हेचे उपचार करितात, परंतु नवीन डॉक्टर लोक अतिशय तापाची उष्णता चढली असतां उष्णता कमी करण्यासाठीं चापून रोग्याच्या डोक्यावर बर्फ ठेवितात, अशा वेळीं जुन्या पद्धतीनें औषधें देतां देतां रोगी मेला, तरी त्यामध्यें वैद्याच्या चुकीनें किंवा अज्ञानानें तो रोगी मेला असें न समजतां, भवितव्यतेनें किंवा दुसऱ्या अनेक कारणांनीं रोग्याचा तसा परिणाम झाला असें लोक मानितात; परंतु तेंच जर का डॉक्टर डोक्यावर इकडून तिकडे बर्फ ठेवीत आहे, डोक्यावर थंडगार पाण्याच्या घड्या घालीत आहे, आणि अशा तऱ्हेनें उपचार होतां होतां दुसऱ्या कांहीं कारणानें प्रकृति विशेष बिघडून तींत त्या रोग्याचा अंत झाला, तर शेंकडो लोक "अरेरे, पहा, डॉक्टरानें बर्फ डोक्यावर ठेवून थंड पाण्याच्या घड्या घालून राक्षसी उपचार केले, ह्मणून रोगी मेला." असें ह्मणूं लागतात.

तसेंच एकाद्या शेतांत जुन्या परंपरागत पद्धतीप्रमाणें कृषिकर्म चाललें असतां एकादे वर्षीं जर पीक अतिशय कमी आलें, तर त्याचा दोष हवा वाईट होती किंवा कृषिकर्म करणाराला अक्कल नाहीं इत्यादि रीतीनें झांकिला जातो; परंतु तेंच नवीन पद्धतीप्रमाणें कृषिकर्म सुरू झालें, आणि त्यांत जर का एकाद्या वर्षीं पीक कमी आलें, तर त्याचा दोष इकडे तिकडे न टाकितां तें सर्व खापर नवीन पद्धतीच्या डोक्यावर हटकून फुटावयाचें.

त्याचप्रमाणें वैद्यशास्त्रांतही. जुन्या रीतीनें औषधिक्रिया सुरू असूनही ज्वर, सन्निपात वगैरे रोगांत एकादा रोगी दगावला, तर त्याबद्दल लोक चिकित्सकाला फारसा दोष देत नाहींत; परंतु तीच चिकित्सा डॉक्टरादिकांच्या नवीन पद्धतीप्रमाणें होत असली, आणि त्यांत तो रोगी दगावला, तर सर्व लोक त्या डॉक्टराला व त्याच्या त्या राक्षसी चिकित्सेला हजारों शिव्या देतील. याप्रमाणें शेंकडों उदाहरणें देतां येतील.

फार दिवसांपासून चालत आलेल्या गोष्टीमध्यें कोणी फेरफार करूं लागल्यास त्याला मनुष्यें जितकीं प्रतिकूळ असतात, तितकीं नव्या गोष्टीसंबंधानें असत नाहींत, ह्मणूनच एकाद्या बाबतींत किंवा चालींत कोणास कांहीं फेरफार करावयाचा असल्यास त्यानें प्रथमतः अति अल्पप्रमाणानें चालू पद्धतींत थोडासा बदल करावा. मग त्या अति अल्प फेरफारापासून कांहीं एक सुधारणा झाली नाहीं, किंवा फारच थोडी जरी सुधारणा झाली, तरी हरकत नाहीं. कारण एकदा ठरींव पद्धतींत, अति थोडा कां होईना, फेरफार होऊं लागला, ह्मणजे पुढें एकामागून एक हळू हळू फेरफार करण्यास अडचण पडत नाहीं. एकादी इमारत बांधली ह्मणजे तिच्या भिंतीचा चुना ओला असतो तितक्या अवकाशांत तींत वाटेल तसा फेरफार होऊं शकतो; आणि तोच एकदा चुना वाळून गेला ह्मणजे फेरफार करणें बरेंच कठीण पडतें. हीच गोष्ट कायद्यामध्यें आणि शेंकडो व्यावहारिक बाबतींमध्यें लागू पडते. एकादा खरोखर लोकांस दुःख देणारा अडचणीचा जुना कायदा असेल, तर वर्षानुवर्ष किंबहुना पिढ्यान्‌पिढ्या त्यांत फेरफार होत नाहीं; आणि तेंच नवीन आक्टाकडे पहा. एक आक्ट छापून प्रसिद्ध झाला न झाला, तोंच त्यांत सुधारणा होऊन कांहींना कांहीं बदल होतच असतो. आपल्या वैदिक

धर्मांच्या इतिहासाकडे पाहिलें, तरी सुद्धां वरील सिद्धांताची प्रतीति येणार आहे. अतिप्राचीन काळचे जे ऋग्वेदादि ग्रंथ, ते इतके शुद्ध व उत्तम तऱ्हेनें राखिले गेले आहेत कीं, त्यांत यत्किंचित् शब्द काय, पण रेखामात्रेचाही फेरफार न होतां, अतिप्राचीन काळीं जसें त्यांचें स्वरूप होतें, तसें तें अविकृत ठेविण्याविषयीं हिंदुलोकांचा केवढा तरी कटाक्ष! आज हजारों वर्षें गेलीं, छापखाने नाहींत, शाळा नाहींत, सरकारी आश्रय नाहीं, पुस्तकालयें नाहींत, तरी **काशीपासून रामेश्वरापर्यंत** ऋग्वेदादि वेदग्रंथांचें सर्वत्र एकच रूप; आणि आतां तेंच स्मृतींचें **पहा.** शेंकडों स्मृतींत निरनिराळे पाठभेद; त्यांत निरनिराळ्या स्मृति, व त्यांत निरनिराळे फेरफार. तात्पर्य, वेदापेक्षां स्मृतींत अधिक फेरफार व त्यांपेक्षांही पुराणांमध्यें जास्ती. पुराणांत तर दोन हजार वर्षांपासून **सत्यनारायणाचे** कथेपर्यंत सारखे फेरफार वगैरे होतातच आहेत.

तीच गोष्ट धर्मपंथाची घ्या. निरनिराळ्या महर्षींनीं, पंडितांनीं व विद्वानांनीं वैदिक धर्मांत मोठमोठे फेरफार केले आहेत. पण ते सर्व हळू हळू होत गेल्याकारणानें ते सार्वत्रिक व बहुजनसंमत झाले आहेत. प्रथमतः ऋग्वेदाचें अवलोकन केलें, तर त्यांतील **अग्नि, वरुण, द्यावापृथिवी, रुद्र, मरुत्** इत्यादि शेंकडो देवता. तात्पर्य, हा स्तोत्रकाल. त्यानंतर लागलें कर्मकांड; ऐतरेय ब्राह्मण, शतपथ ब्राह्मणादि अनेक ब्राह्मणग्रंथ. **लाट्यायन, आपस्तंब, द्राह्यायन,** इत्यादि शेंकडों सूत्रकारांचे ग्रंथ पाहिले, तर त्यांत ओतःप्रोत भरलेलें कर्मकांड. नंतर पहावें तों उपनिषद् काल. त्यांत पहावें, तर स्रुवा, बर्हि, अग्नि, होता, उपवक्ता, इत्यादि कर्मकांडांतील पदार्थांचें अध्यात्मपर विवेचन. असो; नंतर पहावें तों पुराणाचा भक्तिमार्ग. **ब्रह्मा, विष्णु, महेश, शिवपार्वती, दामोदर, परशुराम, कृष्ण, गणपति** इत्यादि देवतांचें हें मन्वंतर निरा-

ळेंच; शिवाय बुद्धांकडून व जैनांकडून आलेल्या रीतिभाती, संप्रदाय, मतें इत्यादिकांचें मिश्रण. तात्पर्य, हे सर्व फेरफार होण्यास हजारों वर्षें लागलीं; परंतु हे फेरफार हळू हळू होत गेले, ह्मणूनच बहुजनसंमत झाले. **शंकराचार्याला** कर्माची कटकट नको होती, परंतु त्याच्यानें त्याचा सर्वथा अव्हेर करवेना; ह्मणून चित्तशुद्धीपर्यंतच कर्म पाहिजे, व कर्माचा खरा उपयोग चित्तशुद्धि, पुढें तें नसलें तरी हरकत नाहीं, असें ठरवून कर्माचें महात्म्य कमी करून त्यानें बेतानें ज्ञानाचें महात्म्य वाढविलें. **मध्वाचार्याचे** अनुयायी वैष्णव, त्यांना पशुहिंसायुक्त यज्ञच नको होता. परंतु यज्ञ नकोत असें त्याच्यानें ह्मणवेना, ह्मणून त्यानें पिष्टपशूंची कांस धरली. **स्वामिनारायणाला** आपलेंच तट्टू पुढें ढकलायाचें होतें. जातिभेद त्याला मोडावयाचा होता. ब्राह्मणांचें उपाध्यायत्व नाहींसें करून टाकायाचें होतें. **महंमदानुयायांसारखे** व **ख्रिस्तानुयायांसारखें** किंवा **शिखांसारखें** आपलें धर्मपुस्तक स्वतंत्र असावें अशी त्याची इच्छा होती, व त्याप्रमाणें त्यानें **शिक्षापत्री** ह्मणून ग्रंथ केला आहे सुद्धां. परंतु तो मोठा धूर्त होता. हल्लींच्या प्रार्थनासमाजिष्ट, ब्रह्मसमाजिष्ट, **विधवोद्वाहविवेकादि** पुस्तककर्ते इत्यादि पंडितांप्रमाणें सर्व जगांतील निरनिराळे इतिहास व धर्मग्रंथ यांचा अभ्यास त्यानें केला नव्हता. परंतु त्याची बुद्धि स्वभावतःच तीक्ष्ण व विलक्षण शोधक होती. त्यानें पाहिलें कीं, मी मोठा योगी खरा, हजारों लोकांना दृष्टिमात्रानें स्तंभवत् करण्याचें माझें सामर्थ्यही खरें, परंतु एवढी माझी शक्ति असूनही हजारों वर्षांचे परंपरागत विचार व चालीरीती केवळ माझ्या एकट्याचे यत्नानें बदलतील ही गोष्ट अशक्य आहे. ह्मणून त्यानें खुबीनें फेरफार केले, व अर्थात्च ते फेरफार लोकव्यवहारज्ञानपूर्वक केले असल्या कारणानें अवघ्या पंचाहत्तर वर्षांत त्याच्या अनुयायांनीं बहुतेक सर्व **काठेवाड, गुजराथेचा** बहुतेक

भाग, वगैरे व्यापून टाकिले. त्याच्या संप्रदायाची गुजराथेमध्यें आज हजारों मंदिरें आहेत. वास्तविक पाहतां आमचा ब्रह्मसमाज स्थापन होऊनही बरींच वर्षें झालीं, पण त्याच्या अनुयायांची संख्या इतकी परिमित कां असावी याचें कारण वरील सिद्धांतांतच आहे.

स्वामिनारायणानें हजारों ब्राह्मणांस आपले नियम पाळावयास लाविलें, पण त्यानें त्यांना येशू ख्रिस्त किंवा महंमद ह्यांच्याप्रमाणें वैदिक, धार्मिक, संध्यादिक कर्में टाकून देण्यास सांगितलें नाहीं. आपल्या अनुयायांनीं आपल्या मंदिरांमध्यें प्रतिदिवशीं दर्शनार्थ यावें ही त्याची इच्छा, व त्याप्रमाणें त्याचे अनुयायी तो नियम पाळतातही. परंतु इतर देवांना भजूं नये, किंवा इतर देवालयांत किंवा तीर्थयात्रेस जाऊं नये, असा त्यानें निषेध केला नाहीं. जातिभेद मोडावयाची त्याची इच्छा खरी; परंतु तो नियम सर्वत्र लागू होणें अशक्य असें त्याला आढळून आलें, तेव्हां साधूंमध्यें मात्र सर्वांनीं ( लोहार, सुतार, कासार, शेतकरी इत्यादि पूर्वींचे निरनिराळ्या जातीचे, परंतु पुढें साधू झालेले, अशांनीं ) एकत्र जेवावें असा त्यानें रिवाज पाडिला. वल्लभाप्रमाणें रोज स्त्रीपुरुषांनीं मंदिरामध्यें ५ वेळ दर्शनास तर यावयाचें, परंतु स्त्रीपुरुषांचे रस्ते मात्र भिन्न भिन्न. तात्पर्य, त्यानें वल्लभाचार्यांच्या अनीतिप्रद धर्मपंथाविरुद्ध पंथ काढिला, पण त्यानें वल्लभाचे बहुतेक संप्रदाय वगैरे कायम ठेवून जेवढ्या वाईट गोष्टी होत्या तेवढ्या मात्र अगदी बंद केल्या. तात्पर्य, स्वामिनारायणानें मानवमनोवृत्तींत ज्ञानपूर्वक फेरफार केले ह्मणून ते अति अल्पकाळांत सर्वजनसंमत झाले.

आमच्या नवीन सुधारकांचें मात्र या सर्व प्रकारच्या सुधारणांमध्यें अगदीं फसल्यासारखें होतें. सुधारकांचें मत असें आहे कीं, ह्या एकोणिसाव्या शतकामध्यें जगांतील सर्व राष्ट्रांचें झपाट्यानें दळणवळण

सुरू झालें आहे, निरनिराळ्या देशांत व द्वीपांत जाण्याचीं साधनें अगदीं निर्भय व सुलभ झालीं आहेत, तेव्हां अशा वेळीं आमच्या देशांतील लोकांनीं निरनिराळ्या देशांत व्यापारास जावें, दुसरे देशांत जाऊन त्यांनीं कलाकौशल्य शिकावें. आतां या सर्व गोष्टींस आमचे देशांतील आचार त्यांना फार आड येतात. जातिभेदाचें स्वरूप त्यांना भयंकर वाटतें, तेव्हां राष्ट्राच्या सुधारणेस हे आचार व हें जातिभेदाचें बंड समूळ नाहींसें व्हावें असें त्यांना वाटतें. हा त्यांचा हेतु वाईट आहे असें सिद्ध होण्यास बरीच अडचण पडेल. वास्तविक पाहतां आमच्या सुधारकांनीं वैदिक धर्माच्या जुन्या इतिहासाकडे, लोकांच्या समजुतींकडे, साधुसंतांच्या चारित्रांकडे, व पुराणांतील मतांकडे लक्ष दिलें असतें, व इतकें अवलोकन करून त्यांतून रस्ता काढण्याचा विचार केला असता, तर त्यांचा हेतु पुष्कळ सिद्धीस गेला असता. आमच्या मताप्रमाणें त्यांनीं श्रुतिस्मृतिपुराणें वगैरे प्रमाण मानून मूर्तिपूजेस फांटा न देतां बेताबाताची संध्या वगैरे करून साधुसंतांचा भजनीमार्ग जर पत्करिला असता, आणि केवळ जातिभेद व आचार (सोंवळेंओंवळें इत्यादि) इतक्यांचाच समाचार घ्यावयाचा असा त्यांनीं यत्न केला असता, तर आमच्या मतें त्यांना पुष्कळ यश आलें असतें. हल्लींचा बहुजनसमूह व सुधारक यांच्यामध्यें अंतर फार; सुधारकांस वेद नको, शास्त्र नको, स्मृति नको, पुराण नको, कांहीं नको; तेव्हां अर्थातच लोकांचें व सुधारकांचें बनावें कसें? सुधारक हे हिंदुधर्माच्या बाबतींत सुधारणा करण्यास लायक आहेत असें सामान्य लोकांस वाटतच नाहीं; कारण हिंदूंच्या मानिलेल्या शंभर गोष्टी पैकीं दहावीस गोष्टीही सुधारकांत आढळून येत नाहींत. **दयानंद सरस्वती**च्या **आर्यसमाजा**चा प्रसार विशेष होण्याचें कारण, त्यानें वेदांस प्रमाण मानिलें हें होय.)

पुनर्विवाहाचेंच उदाहरण घ्या. त्यांतही अशीच घाई. सुधारकांनीं प्रथम अक्षतयोनिकन्यकेचेच पुनर्विवाह सुरू केले असते, किंवा वाङ्निश्चय पूर्वी करून रजोदर्शन झाल्यावर गर्भाधानाचे वेळीं सप्तपदी करायाची असा थोडासा फेरफार हातीं धरिला असता, तर आज त्यांच्या यत्नास पुष्कळ यश आलें असतें असें आह्मांस वाटतें. परंतु सुधारकांना इतका धीर कोठून येईल? एकाच खेपेस देशस्थाचा वर, तर कोंकणस्थाची विधवा, आणि तीही पाहिजे तेवढी मोठी. विवाहाचा विधिही प्रार्थनासमाजास अनुसरून. तेव्हां अशा कार्यामध्यें हें कृत्य सशास्त्र आहे असा लोकांचा भरंवसा कसा बसावा! तात्पर्यः— "फेरफार करावयाचे ते हळू हळू लहान लहान करावे, एकदम मोठे करूं नयेत."

"नव्या गोष्टींचा हव्यास करणें जितकें वाईट, तितका जुनें तेंच धरून बसावयाचें हा आग्रहही वाईट. जुन्या काळाला जे वाजवीपेक्षां फाजील पूज्य समजतात ते नव्या लोकांना तिरस्कारास्पद होतात." मनुष्यजातीमध्यें दोन प्रकारच्या प्रवृत्ति आढळतात. एक, एकदम एकसारख्या नव्या नव्या सुधारणा करीत सुटावयाचें, व दुसरी, ठरींव रूढि, मग ती कितीही गैरसोईची व अनर्थप्रद कां असेना, तिलाच चिकटून रहावयाचें. प्राचीन परंपरागत चालत आलेल्या राज्यपद्धति व संस्था ह्या किल्ल्यांचें, सुधारणासेनेचा प्रवेश बंद न करितां, योग्य रक्षण कसें करावें, याविषयीं अनेक प्राचीन व अर्वाचीन कायदेपंडितांनीं विचार केले आहेत, परंतु त्याचा निःसंशय निकाल अजूनपर्यंत झाला नाहीं. **मीड्स लोक, पर्शियनलोक, लायकरगस**, वगैरेंनीं तर कोणच्याही काळीं आमच्या कायद्यांत फेरफार करूं नयेत असें स्पष्ट लिहिलें आहे. बस, तर आह्मीही आपले आमच्या सनातन धर्मशास्त्रग्रंथांत सांगितल्याप्रमाणें वागणार, आह्मांला देशकालाप्रमाणें आमच्या वर्तनांत कांहीं एक फेरफार करावयाचा नाहीं; कारण

आमच्या सनातन महान महर्षींनीं जे नियम केले आहेत ते सर्व काळाला अनुसरून आहेत, त्यांत चूक ह्मणून असण्याचा संभवच नाहीं, कारण ते सर्वज्ञ होते, असें समजून जर कोणी प्राचीन पंडितांचें व स्मृतिकारांचें वाजवीपेक्षां फाजील स्तोम वाढवील, तर खरोखर असें करण्यांत त्यांच्या हातून ज्या दोन मोठ्या चुक्या होतील तिकडे ते लक्ष देत नाहींत असें ह्मणणें भाग पडतें. प्रथम चूक अशी कीं, ते प्राचीन पंडित अथवा स्मृतिकार ज्या वेळेस झाले, त्या वेळेस कदाचित् त्यांनीं जें सांगितलें तें सर्व लोकांनीं कांहीं कारणानें शंका न काढितां ऐकिलें असेल, व त्याचप्रमाणें कित्येक शतकेंपर्यंत सुद्धां चाललें असेल; परंतु तशी अंधपरंपरा पुढच्या अनेक काळीं सुद्धां तशीच चालेल, व पुढच्या पिढीचे सर्व लोक जुन्या काळच्या लोकांप्रमाणें पूर्वजांना अगदीं अमानुष धरून चालतील, असें मानणें केवळ असमंजसपणाचें आहे. असें मानणें ह्मणजे पृथ्वीवर सर्वत्र जड व मृत वस्तूंचीच वस्ती आहे असें मानण्यासारखें होय. शिवाय, दुसरें 'तुष्यतु दुर्जनः' या न्यायानें असें जरी आपण गृहीत घेतलें कीं आमच्या पूर्वजांना त्रिकाळज्ञान होतें, तरी पण हल्लींच्या काळीं निरनिराळे शेंकडों हजारों प्रसंग येत आहेत कीं, अशा वेळीं फेरफार केलेच पाहिजेत. फार काय, पण ज्या सनातन पंडितांना आतां आपण अमानुष ह्मणतों, तेच जर आज असते, तर हे नवे प्रसंग पाहून त्यांनीं आपणच होऊन सर्व योग्य फेरफार केले असते. आमच्या भरतखंडांत तर महर्षींनीं दरेक युगाचे धर्म निरनिराळे सांगितलेच आहेत. जागोजागीं स्मृतिग्रंथांतून देशकाल पाहून धर्माचें आचरण करावें असें सांगितलें आहे. वास्तविकपणें विचार करितां याचा अर्थ असा आहे कीं, शास्त्रांत जरी निरनिराळे धर्म सांगितले असले, तरी त्यांचा अंमल देश व काल पाहून करावा. उदाहरण, कार्तिक-मासामध्यें प्रातःस्नान करावें ह्मणून सांगितलें आहे, व त्याप्रमाणें निर-

निराळ्या क्षेत्रांत त्याप्रमाणें लोक प्रातःस्नान करितातही. परंतु हें स्नान नेपाळ किंवा काश्मीर किंवा हिमालय ह्यांसारख्या अतिथंड प्रदेशांत करूं नये. तसेंच संन्याशानें एका गांवांत तीन दिवस राहूं नये असा नियम असला, तरी पावसाळ्यांत त्या नियमाप्रमाणें वागूं नये ह्मणून संन्यासी वगैरे एका गांवांत चातुर्मास राहतात. तात्पर्यः—असे योग्य नियम असून, व ऋषिजनांनीं देशकाल पाहून आचारविचारांत फेरफार करावा असें सांगितलेंहि असून, अंधपरंपरेनें चालणारे लोक तिकडे लक्ष देत नाहींत. देशकालाप्रमाणें आचारविचारांत फेरफार करावा, याचा अर्थ ते इतकाच समजतात कीं, शूद्राचें पाणी घेऊं नये असें शास्त्र आहे, परंतु **गुजराथ** देशांत लोकाचार आहे सबब तेथें मात्र शूद्रोदक घेण्यास **गुजराथी** ब्राह्मणास निषेध नाहीं. असो.

सनातन महर्षींनीं जे नियम करून ठेविले आहेत तेच महर्षि आज असते, तर त्यांनीं योग्य फेरफार केले असते. याचें ठळक उदाहरण आमच्या पंचांगाचें. अतिप्राचीन काळीं **आर्यभट्टादि** जे **ज्योतिःशास्त्र**-वेत्ते आमच्या देशांत होऊन गेले, त्यांनीं त्या वेळच्या वेधांवरून समजलेल्या ग्रहांच्या गतींच्या अन्वयें पंचांगें करण्याच्या सारण्या सामान्य लोकांसाठीं तयार करून ठेविल्या होत्या. पुढें अनेक शतकें लोटलीं, ग्रहांच्या गतींत फेर पडूं लागला, त्यामुळें अर्थात्च प्राचीन सारण्यांनीं पंचांगांत चूक पडूं लागली, व तिचें प्रत्यक्ष उदाहरण ग्रहणादिकांमध्यें दिसूं लागलें, तेव्हां पुढें अनेक वर्षांनीं **गणेश दैवज्ञ** वगैरे **ग्रहलाघवादि**-ग्रंथकारांनीं पुनः वेध घेऊन पंचांगांतल्या सारण्या पुनः सुधारल्या, व ग्रंथांत लिहून ठेविलें कीं, नेहमी वेध घेऊन याचप्रमाणें देशकालपरत्वें पंचांगांत फेरफार करावा. असें सांगितलें आहे, तरी अंधपरंपरेनें चालणारे लोक कधीं ऐकावयाचे नाहींत. त्यांना जुनीं चुकलेलींच पंचांगें

धर्म वाटतात. वास्तविक पाहतां जुने महर्षि किंवा आर्यभट्टासारखे पंडित हे जर आजकाल असते, तर त्यांनीं खरोखर पुनः वेध घेऊन पंचांगांत सुधारणा केल्या असत्या. व्यवहारांतील महत्वाच्या बाबतीं-मध्यें मनुष्यांना केवळ कांहीं तरी फेरफार केलाच पाहिजे अशा हौसेनें फेरफार करणें आवडत नाहीं, असें कित्येक विद्वानांचें मत आहे. आतां व्यवहारामध्यें अकस्मात् जंगी फेरफार होतात, सनातन काळापासून चालत आलेल्या संस्थांचे कित्येक वेळां सत्यनाश झालेले दृष्टीस पडतात, मोठमोठ्या रक्तस्रावाच्या राज्यक्रांति झालेल्या आपल्या ऐकिवांत आहेत, त्याचप्रमाणें कित्येक वेळां तऱ्हेवार व विलक्षण झालेल्या गोष्टी व धर्मक्रांतिही आपणाला माहीत आहेत. फार लांब कशाला, पण अगदीं अलीकडच्या काळीं, ह्मणजे दहा पांच वर्षांत, **ब्रेजिल, पोर्तुगाल, स्पेन** वगैरे देशांत मोठमोठ्या राज्यक्रांति झालेल्याही आपल्या ध्यानांत आहेत. तरी ह्या सर्व गोष्टी ज्या झाल्या, त्या केवळ फेरफाराच्या हौशी-नेंच झाल्या असें बिलकुल ह्मणतां येणार नाहीं. ज्याप्रमाणें मनुष्यें निव्वळ गमतीखातर अगर चैनीसाठीं निरनिराळे पोशाख करितात, त्याप्रमाणें केवळ रुचिवैचित्र्यास्तव मनुष्यें धर्म अथवा राज्यव्यवस्था यांत कधींही फेरफार करीत नाहींत. अतिशय महत्वाच्या ह्मणजे धर्मसंबंधी अगर राज्यसंबंधी बाबतींत मनुष्यें फेरफाराची इच्छा करितात, ती केवळ धर्माच्या अगर राज्यव्यवस्थेच्या वैगुण्यामुळें पडणारीं अत्यंत कष्टप्रद दुःखें निवारण्यासाठीं, किंवा कांहीं मोठ्या अडचणींतून पार पडण्यासाठीं, किंवा त्यापासून येणाऱ्या भावी अनि-ष्टाच्या परिहारासाठीं होय.

सामान्य अशिक्षित लोकांना, दुःखाचीं कारणें काय व आहेत तीं टाळ-ण्यास काय उपाय करावेत, हें जरी नीटपणें कळत नाहीं, तरी ज्या वेळीं

कांहीं तरी मोठा फेरफार करण्याविषयीं ते उद्युक्त होतात, त्या वेळीं त्यांना कांहीं तरी दुःख होत असतें यांत बिलकुल संशय नाहीं. लहान मुलें आपल्या दाईला जेव्हां मारीत सुटतात किंवा हात पाय आपटतात, तेव्हां तें आपल्याला वेड्या कुड्यासारखें भासतें; परंतु तीं मारितात तेव्हां अत्यंत दुःखानुबद्ध असतात हें निर्विवाद आहे. तसेंच अशिक्षित लोक दुष्काळानें किंवा महामारीसारख्या रोगानें अत्यंत ग्रस्त होतात, तेव्हांच काय ते धनिक लोकांना ठार करून त्यांचें धन लुटण्याच्या भरीस पडतात. आतां हें खरें आहे कीं, अव्यवस्थितपणानें फेरफार करूं लागलें ह्मणजे त्यापासून अनर्थ उद्भवतातच. हे अनर्थ टाळण्यासाठीं शाहण्या लोकांनीं नेहमी शांतपणानें, हल्लीं कोणते फेरफार करणें जरूरीचें आहे, त्यांपैकीं कोणते अगदीं केलेच पाहिजेत, वगैरे बाबतींचा विचार करून विलंब न लावितां व्यवस्थित आणि नियमित रीतीनें फेरफारास सुरुवात करावी. धर्मशास्त्रामध्यें एकादी गोष्ट आपणास अनिष्टशी वाटली, तर प्रामाणिक आणि विद्वन्मान्य ग्रंथकारांच्या संमतानें आपण ती गोष्ट वर्ज्य करावी; पण त्या एकट्या गोष्टीसाठीं सर्व धर्मशास्त्र धाब्यावर बसवूं नये. असें न करितां कांहीं अनिष्ट गोष्टी टाळण्यासाठीं सर्वच धर्मशास्त्राला जर हरताळ लाविली, तर थोड्याशा इष्ट गोष्टींपासून जो फायदा व्हावयाचा त्याच्या सहस्रपट नुकसानें धर्मशास्त्राला सर्वत्र हरताळ लाविल्यानें होणार. हल्लीं आपणाला जीं शेंकडों अनिष्टें दृष्टींस पडतात, तीं योग्य वेळीं भावी अनिष्टाकडे नजर देऊन फेरफार केले नाहींत ह्मणून. उदाहरणार्थ, द्विजव्यतिरिक्तांना धर्मसंबंधी विधि वगैरेंचा हक्क नव्हता, त्यामुळें त्यांना वाईट वाटत असे. वास्तविक पाहतां बुद्धधर्म उत्पन्न होण्याच्या पूर्वींच स्मृतिकारांनीं लोकरुचीस अनुसरून गरजेप्रमाणें द्विजव्यतिरिक्तांविषयीं काळजी घेतली असती, तर भरतखंडांत बुद्धांचें व जैनांचें प्राबल्य एका काळीं जितकें झालें होतें तितकें कधींही

झालें नसतें. तसेंच परवां चहाबिस्कुटासंबंधानें **शंकराचार्यांचे** अधिकाऱ्यांनीं जें देशकालवर्तमानदर्शित्व दाखविलें, तें **मुसलमानांच्या** अवनतीच्या व **महाराष्ट्रीयांच्या** उन्नतीच्या वेळीं दाखविलें असतें, व जशास तसें या न्यायानें बळजोरीनें **मुसलमान** केलेल्या **मुसलमान** लोकांना व **गोंव्याकडच्या** बाटिवलेल्या **ख्रिस्त्यांना** खुषीनें **हिंदु** केलें असतें, तर आज **हिंदुस्थानांत** दुफळ्या पडून जंगी सामने झाले नसते. तात्पर्यः—वेळच्या वेळेस सूक्ष्म अवलोकन करून योग्य असे लहान लहान फेरफार करावे, म्हणजे भयंकर व अनर्थावह धर्मक्रान्त्या होत नाहींत हें ह्मणणें किती समंजस आहे, याजविषयीं वाचकांची सहज खात्री होईल. तेव्हां केवळ फेरफार म्हणून संस्थानांत अगर राज्यव्यवस्थेंत फेरफार करूं नयेत.

"फेरफार—मग तो केवढाही अल्पका असेना,—करूंच नये" असें जे ह्मणतात, ते आपल्या सिद्धांताचें हितावहत्व सिद्ध करितात, तें असें. ते ह्मणतात "अति अल्प जरी फेरफार केला, तरी मग त्यानंतर पुनः फेरफार, त्यानंतर पुनः, असे होतां होतां शेवटीं मोठे मोठे अनर्थावह फेरफार होऊं लागतात. तेव्हां प्रथमपासूनच यत्किंचित्‌ही फेरफार न करण्याबद्दल सावध रहावें हें बरें," सकृद्दर्शनीं त्यांचें हें ह्मणणें खरें वाटतें, व अल्प फेरफारापासून अत्यंत अनर्थावह फेरफार झाल्याचीं उदाहरणेंही आढळतील. परंतु त्यांचें कारण मात्र स्थैर्यवादी फेरफार करूं नये असें सांगतात तें नव्हे. अनर्थावह फेरफार होण्याचें खरें कारण योग्य वेळीं लहान लहान फेरफार केले नाहींत हेंच होय. ह्मण आहे कीं गळायाला लागलें कीं, लगेच सावधपणानें एक कौल घातलें म्हणजे नऊ कौलें वांचतात. हाच दृष्टांत मानुष्य व्यवहारांत लागू आहे. एकाद्या वाड्यास वेळच्या वेळेस थोडेसें नादुरुस्त झालें कीं लगेच डागडु-

नी करायाची असा रिवाज ठेवला, व तसें करीत गेलें, तर तो वाडा शेंकडों वर्षें जशाचा तसा खंबीर राहील. तसेंच, आज काय घराची एक भिंत पडली, उद्यां दरवाजा पडला, परवां कुसूं मोडलें, तेरवां कठडा मोडला; तात्पर्य, दरएक दिवशीं घर नादुरुस्त होत असतांही तिकडे वर्षानुवर्ष दुर्लक्ष केलें, तर त्याचा परिणाम एवढाच होईल कीं, अशीं कित्येक वर्षें लोटलीं म्हणजे तें घर अगदीं मोडकळीस येईल, त्यामुळें तें सर्व पाडून टाकून अगदीं नवें बांधिल्यावांचून खचित सुधारणार नाहीं. योग्य वेळीं ज्या सुधारणा करायाच्या त्या जितक्या लांबणीवर पडतील तितक्या त्या विशेष अनर्थावह होतील, आणि नंतर मग या अनर्थाचें कारण कोण समजले जातील? अर्थात् ज्यांनीं वेळच्या वेळीं सुधारणा केल्या नाहींत ते.

( "सुधारणा करण्याचे बाबतींत मनुष्यांनीं काळाचें अनुकरण करावें"....कोणत्याही गोष्टींतील फेरफार करावयाचे ते अशा रीतीनें केले पाहिजेत कीं, ते फेरफार नवे आहेत असा लोकांस भास सुद्धां होतां कामा नये, इतक्या ढिलेपणानें व मंद रीतीनें ते फेरफार करावेत. आपल्या वैदिक धर्माकडेच पहा; अत्यंत प्राचीन काळीं म्हणजे ऋग्वेदाच्या वेळीं लोक नुसतीं स्तोत्रेंच ह्मणत. पुढें हळूच कर्मकांड उत्पन्न झालें, व तें वाढत वाढत वाढलें. लोकांना त्याचा कंटाळा आला, तेव्हां ज्ञानकालाचा उदय झाला. परंतु पुढें ज्ञानकालाचें पर्यवसान नास्तिकत्वाकडे किंवा निरीश्वरवादाकडे झुकूं लागलें, तेव्हां विचार करून थकल्यावर शेंवटीं श्रद्धा व भक्ति यांचें माहात्म्य वाढलें. त्यापासून कांहीं इष्ट व पुष्कळ अनिष्ट परिणाम उत्पन्न झाले. नंतर कित्येक वर्षें अज्ञानकाल गेला. इतकीं वर्षें लोटलीं तरी सामान्यजनसमूह ज्ञानरहितच होता. कारण सर्व ग्रंथ संस्कृतभाषेंत होते. त्यांत फेर इतकाच होता कीं, अतिप्राचीन काळीं द्विजांवांचून इतरांना धर्मपुस्तकें व धर्मसंबंधी ज्ञान संपादन करण्याची मनाई असे. पण पुढें व्यासादिक महर्षीनीं तें सर्व वैदिक व दार्शनिक

ज्ञान पुराणांत आणून त्याचा अधिकार स्त्रीशूद्रांस दिला. तरी पण ते सर्व ग्रंथ संस्कृतांत असल्या कारणानें त्याचा लाभ सर्व जातींस आचंडालान्त झाला नाहीं. तो लाभ पुढें प्राकृतांत साधुवंशीय रंगनाथ स्वामी वगैरेंनीं सर्वत्रांस करून दिला.

प्रसंगवशात् अप्रस्तुत गोष्ट आहे तरी तिचें या ठिकाणीं विवेचन करितों. शूद्रांस धर्मपुस्तक वगैरेंचा अधिकार नाहीं, याचा खरा अर्थ असा नव्हे कीं, त्यांनीं पुस्तक हातांतही घेऊं नये, किंवा शिकूं नये. या बाबतींत लोकांचे किंवा पाश्चात्यांचे ठरींव विचारांपेक्षां आमचें मत भिन्न आहे. पाश्चात्य पंडित व तदनुयायी भारतीय संस्कृतज्ञ सुद्धां ह्मणतात कीं, ब्राह्मणांनीं विद्या चोरिली, ती दुसऱ्यांना मिळून दिली नाहीं. पण हें म्हणणें आम्हांस पसंत नाहीं. शूद्रांनीं विद्या शिकूं नये, याचा अर्थ एवढाच कीं, जसे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, या वर्णत्रयांपैकीं लोकांची खुषी असो अगर नसो, त्यांना जर वैदिक धर्म पाळावयाचा असेल, तर ब्राह्मणांनीं जन्मभर वेदादिकांचें अध्ययन व अध्यापनच केलें पाहिजे, व क्षत्रियवैश्यांनीं वेदादिकांचें अध्ययनच केलें पाहिजे. तात्पर्य, वर्णत्रयानें हें केलेंच पाहिजे अशी जशी त्यांवर सक्ती आहे, तशी शूद्रांवर सक्ती नाहीं एवढेंच. म्हणूनच, सुश्रुतादिक ग्रंथांमध्यें '**किंचिद् बुद्धिमंतशूद्रमापि अध्यापयेत् इत्येके**' म्हणजे बुद्धिमान् शूद्र असल्यास त्याला आयुर्वेद शिकवावा असें कित्येक विद्वानांचें म्हणणें असल्याविषयीं उल्लेख आहेत. तात्पर्य, शूद्र म्हणजे त्या वेळच्या सामाजिक व्यवस्थेप्रमाणें अष्टौप्रहर कामांत मग्न असणारे लोक, त्यांना १२, १४ वर्षेपर्यंत वेदादिकांचा अभ्यास केला पाहिजे अशी सक्ती कशी करितां येईल? अर्थात् येणार नाहीं हें उघडच आहे. अशी जरी गोष्ट आहे, तरी पण पुढच्या पंडितांनीं अगर स्मृतिकारांनीं हा भावार्थ न समजून शिसें ओतणें वगैरे राक्षसी नियम अज्ञानानें केले असावेत. असो, हे फेरफार बेताबातानें झाले, यामुळें विशेष बोभाटा

न होतां ते सर्वव्यापी बनून राहिले. फार दिवसांपासून चालत आलेले प्रमाद जर एकदम सुधारले, तर सामान्य लोकांना असें वाटतें कीं, हें कांहीं नवेंच झालें, पण वास्तविक पाहतां सनातन काळापासून मध्यें ज्या चुका झाल्या त्या सुधारिल्या असत्या, तर सुधारून त्यांला प्रकृतच स्वरूप प्राप्त झालें असतें. उदाहरणार्थ, ब्राह्मणांनीं षडंग वेदाचें अध्ययन निष्काम करावें, इतिहासपुराणांचा अभ्यास करावा, असें स्मृत्यादि ग्रंथांत सांगितलें आहे. आतां याची वास्तविक तऱ्हा अशी कीं, प्रथम वेद ह्मणावा, नंतर व्याकरणादि षडंगें यांचें अध्ययन करावें, इतिहासादिकांचें वाचन करावें, ही मूळची परिणाळिका. पण हल्लीं व्यवहारांत याचा घोंटाळा कसा उडून गेला आहे, पहा. **'यद्वेदाध्ययनं तथोपनिषदां सांख्यस्य योगस्य च'** इत्यादि साधी अध्ययनाची पद्धति सुटून गेली, व सर्वत्र अव्यवस्था होऊन राहिली. वैदिक नुसता वेद तोंडपाठ करितात, व वैय्याकरण, नैय्यायिक वगैरे काव्याचे चार सर्ग सुद्धां न ह्मणतां प्रथमपासूम शेंवटपर्यंत व्याकरणन्यायाचा अभ्यास करितात. दरएकजण आपल्या व्यवस्थेसंबंधानें **'एकः शब्दः सम्यक् ज्ञातः स्वर्गे लोके कामधुग् भवति। तत्वज्ञानान्मोक्षः।** ( एक शब्द चांगला जाणिला, तर स्वर्ग लोकांत त्याचे संकल्प सिद्ध होतात. तत्वज्ञानानें मोक्ष होतो. )' इत्यादि एक दोन वाक्यें संग्रहीं ठेवितो. आतां कोणी खरा वैदिकधर्माभिमानी ह्मणेल कीं, अहो, सर्व चाळे सोडून देऊन आतां कागदी धर्मशास्त्राप्रमाणें आणि तेंही अगदीं वेदाप्रमाणें वागावयाचें, तर त्याची ती चूक होईल. लोक ह्मणतील कीं, अरेरे, यानें तर या धर्माचा भ्रष्टाकार आरंभिला आहे. व्यवहारामध्यें लक्षपूर्वक अवलंबन केलें, तर सर्वत्र असें आढळून येईल कीं, एकादी अनिष्ट गोष्ट जर फार दिवसांपासून चालत आली असेल, तर ती जितकी अधिक प्राचीन असेल तितकी कमी अनिष्ट भासते, व तिजबद्दल लोकां-

कडून, ही गोष्ट अनिष्ट आहे, वगैरे उद्गार क्वचित्च निघतात; आणि तीच नवी गोष्ट असूं द्या कीं, तिजपासून अमक्याचें असें नुकसान झालें, तमक्याचें तसें झालें, अशा तक्रारी वारंवार ऐकूं येतात. कल्पना करा कीं, **गायकवाड** सरकारचें राज्य आहे. यामध्यें **खंडेराव, मल्हारराव** वगैरे राजे होऊन गेले. त्यांच्या वेळीं रयतेस न्याय मिळणें, सरकारी कामाचा निकाल जलदी लावणें, वगैरेंविषयीं इतके कडक नियम क्वचित्च होते. काम चाललेंच आहे, निघतेंच आहे, वर्षानुवर्षे कुळें, सावकार हेलपाटे घालतातच आहेत. पण अशा वेळीं कितीही अव्यवस्था, जुलूम, फाजील कर, लांचा इत्यादि संबंधी असल्या, तरी त्या फार दिवसांपासून चालत असल्या कारणानें मोठी अव्यवस्था आहे असें त्या वेळीं लोकांनाही वाटलें नाहीं. पण तीच आतां सरकारी व्यवस्थेमध्यें यत्किंचित् अव्यवस्था झाली, किंवा एकादे ठिकाणीं लांचाचें प्रकरण दृष्टोत्पत्तीस आलें, किंवा जमिनीवर हलकाच कर वाढविला, तर एकदम लोकांत कल्होळ होतो. एकंदरींत ज्या गोष्टी बऱ्याच काळापासून चालत आल्या आहेत व ठरींव होऊन चुकल्या आहेत, त्या उत्तमच असल्या पाहिजेत असें मानण्याकडे लोकांचा कल विशेष असतो. तुह्मी नवीन कितीही सुधारणा करा, लोक आपले जुन्या काळचे पोंवाडे गातात. त्यांना वाटतें, पूर्वीं काय सोन्याचे दिवस होते, आणि आतां काय सर्वत्र दुःखच पसरत चाललें आहे, व हें दिवसेंदिवस असेंच वाढणार पुढची संतति दिवसानुदिवस विशेष दुःखी होणार, असा जुन्या लोकांचा ठराव समज होऊन चुकला आहे; व दिवसानुदिवस जग सुधरत चाललें आहे, प्राचीन लोकांच्या कृत्यांचा, ज्ञानाचा, व शास्त्रीय शोधांचा फायदा पुढचे लोकांस मिळत आहे, हें त्यांच्या ध्यानींही नसतें. उदाहरणार्थ, हल्लीं छापखान्यांच्या योगानें पुस्तकांचें सहस्रपट सौलभ्य झालें आहे

पूर्वी रघुवंशादि काव्यांचे फार झालें तर २–३ सर्ग सामान्य मंडळीकडे असावयाचे. एकाद्या मोठ्याच पंडिताकडे शेंदोनशें कोसांत समग्र सटीक १९सर्ग असायाचे. त्याचप्रमाणें उपनिषदें, न्याय, वेदांत, ज्योतिष, अलंकार, व्याकरण, श्रौत, वैद वगैरे ग्रंथांचें. ज्या ग्रंथांला पूर्वी लिहावयास ५०–६० रुपये लागत, व जे संपादन करण्यास परम कष्ट पडत, व जे परमकष्टानेंही मिळत नसत, किंवा केवळ श्रवणविषयच असत ( उदाहरणार्थ, जुनीं षड्दर्शनें, चरकसुश्रुतादि ग्रंथ), असे ग्रंथ आज ४–५रुपये खर्च करितां सहज मिळतात. तात्पर्य, पुस्तकें छापल्यानें इतकें सौलभ्य झालें असतांही ग्रंथ छापल्यानें विद्या गेली; छापल्यापासून वेद, शास्त्र बुडालें;—अशी जुन्या लोकांची तक्रार आहेच. आमच्या भारतीय पौराणिक पंडितांनीं तर या गोष्टींत कमाल करून सोडिली आहे. कलियुगामध्यें सर्वत्र दुःखमय होणार, व सर्वत्र अधर्म माजून अखेर वर्णसंकर व्हावयाचा, हें त्यांनीं भविष्य करून ठेविलें आहे. या त्यांच्या भविष्यवर्णनाच्या श्रवणानें तदनुयायांना हल्लींचीं सर्व दुःखें अत्यंत अपरिहार्य वाटतात. आज भारतीय प्रजेस जीं दुःखें वाटतात तीं कांहींच नव्हत, त्यांपेक्षांही प्रचंडतर दुःखें त्यांवर येऊन पडावयाचीं आहेत, असें त्यांचें ठाम मत आहे. परभूंच्या घरीं पाणी प्यालें किंवा परस्पर जातींमध्यें विवाह सुरू करावेत असें कोणीं प्रतिपादन केलें कीं पुरे, जुन्या पंथाचे लोक त्या भविष्याकडे बोट दाखवून ह्मणतात कीं, "अशा प्रकारचे विचार नव्या मंडळीच्या डोक्यांत येणें कलिकालाला अनुसरूनच आहे. कलीमध्यें पापाचा अतिरेक होणार. धर्म लयाला जाणार. तेव्हां नव्या मंडळींना हे चाळे सुचतात ते योग्यच आहेत." अशा तऱ्हेनें जुनें मंडळ नवीन मतांचा खुबीदार रीतीनें पाडाव करितात खरा; पण "कायहो, मनुस्मृतींत ब्राह्मणांनीं चारी वर्णांच्या स्त्रियांशीं विवाह करावे असें सांगितलें आहे, तेव्हां तसा प्रचार असल्यावेळीं वर्णसंकरच होता काय?" इत्यादि

प्रश्न त्यांना विचारिले, तर ते काय उत्तर देतील? निरुत्तर होऊन केलेलें विधान बरोबर नाहीं असेंच त्यांना कबूल करावें लागेल, हें उघड आहे.

अनियमित रीतीनें अथवा अव्यवस्थितपणानें एकादा फेरफार केल्यास (मग तो मूळचा चांगला असला तरी) त्यापासून अनर्थ होतात. परंतु शहाण्या धूर्त मनुष्यानें थोडें बारीक लक्ष देऊन वेळच्या वेळेस काय फेरफार करणें इष्ट आहे, कोणचे फेरफार केलेच पाहिजेत (न केले तर चालणार नाहीं), यांविषयीं शोध करून विलंब न लावितां वेळच्या वेळीं बेताबातानें व खुबीनें ते फेरफार केले, ह्मणजे त्यांपासून होणारे अनर्थ टळण्याजोगे असतात. याविषयीं पूर्वी विवेचन केलेंच आहे, तरी विशेष स्पष्टीकरणानें विशेष समजेल ह्मणून पुनः उल्लेख केला आहे. योग्य व चाणाक्ष अधिकाऱ्यानें एकाद्या कायद्यापैकीं गैरसोयीचीं कांहीं कलमें काढून टाकिलीं, आणि जरूर अशीं नवीन कलमें घातलीं, तर निरनिराळ्या महत्वाच्या संस्थांत, व लौकिक किंवा धार्मिक व्यवस्थेंत त्यांचा समग्र पाया नाहींसा न होतां योग्य सुधारणा होतील. परंतु तशा रीतीनें नियमितपणानें कलमांत फेरफार न करितां, अडचण आली कीं कायदा मोडून अगर तशाच कांहीं अयोग्य रीतीनें अधिकाराचें अतिक्रमण करून ती भागविली, तर बेकायदेशीर वर्तनाचा दाखला पडतो; आणि तें बेकायदेशीर वर्तन त्या वेळेपुरतें जरी सद्धेतुपूर्वक असलें, तरी पण त्याच्या योगानें पुढें मोठमोठे भयंकर अनर्थ उत्पन्न होतात. आजपर्यंत कित्येक ठिकाणीं जे मोठमोठे अनर्थ घडून आले, त्यांची कारणपरंपरा कोणीं शोधून काढिल्यास मूळाशीं प्रथम सद्धेतुपूर्वक नियमातिक्रमण हेंच सांपडेल. उदाहरण, राज्यव्यवस्थेमध्यें कोणी अधिकारी लांचखाऊ अगर गैरवर्तणुकीचा आहे अशी राजास बातमी लागली, व ती खरी असली, तरी राजानें एकदम आपली सत्ता वापरून त्या अधिकाऱ्याचें नुकसान करूं नये, तर योग्य अधि-

काऱ्यामार्फत कायद्याप्रमाणें चौकशी होऊन जें ठरेल तें राजानें मान्य करावें; मग राजाला जी बातमी लागली असेल त्याविरुद्ध जरी कित्येक वेळां योग्य अधिकाऱ्याचा ठराव झाला, तरी त्यांत राजानें हात घालून सत्ता वापरूं नये, अशी अलीकडील सुधारलेल्या राष्ट्रांत वहिवाट आहे. कल्पनाकरा कीं, कोणा एका संस्थानाच्या राजाला, आपल्या अमक्या अधिकाऱ्यानें अमक्यापासून अमक्या वेळीं लांच खाल्ला, अशी बरोबर बातमी लागली, व नंतर राजानें एकदम संतापून अयोग्य सत्ता वापरून त्या अधिकाऱ्यास एकदम पकडून मुद्यानिशीं धरिलें, आणि सत्ता वापरून कैद केलें. आतां या वेळीं राजानें जी सत्ता वापरली ती सद्धेतुपूर्वक होती, व त्याच्या बेकायदेशीर वर्तनानें अपराधी त्वरित सांपडला; आणि तेंच रीतीप्रमाणें चौकशी झाली असती तर लांबणीवर काम पडल्यानें हजारों खटपटी होऊन त्या अधिकाऱ्यावर कांहींएक शाबीत झालें नसतें, व तो खरा अपराधी असूनहीं चौकशीअंतीं भवतिनभवति होऊन सुटून जाता हेंही खरें. परंतु राजानें योग्य रीतीनें योग्य अधिकाऱ्याकडूनच अपराधी जनांची चौकशी केली पाहिजे हें तत्व न मानिल्यानें, एकादे वेळेस मरी फायदा झाला तरीही राजानें अशी सत्ता वापरल्यास एकंदरींत त्यापासून आजपर्यंत हजारों अनर्थ झाले आहेत व पुढेंही होतील.

नियमांचें अतिक्रमण केल्यापासून जे महान् अनर्थ गुदरतात, त्यांच्या परिहाराचा एक उपाय आहे तो हाच कीं, दार बंद करून अतिशय जरूरीच्या फेरफाराचा प्रवेश न होऊं देण्याच्या खटपटींत न पडतां योग्य वेळीं त्यास दरवाजा खुला ठेवावा. असें न केलें तर बंद ठेवितां ठेवितां शेवटीं तें दार मोडून जाऊन मग पुढें वाटेल ते अयोग्य व अनर्थावह सुद्धां फेरफार एकदम आंत येऊन घुसतील. ह्मणून योग्य वेळीं योग्य फेरफार करावेत, ह्मणजे एकंदर संस्थेचा पाया नाहींसा न

होतां इष्टसिद्धि होते. असें न झालें, तर मग विधिनिषेधाचा थांग न लागून पुढें अनवस्थाप्रसंग होतो. उदाहरण—आपल्या शास्त्रामध्यें अतिप्राचीन काळीं स्मृतिकारांच्या वेळीं त्या वेळच्या देशकालास अनुसरून नियम लिहिले गेले आहेत. जे वेदशास्त्रांचा सांगोपांग अभ्यास करतील, व जे सदाचरणानें वागतील, त्यांचें माहात्म्य स्मृतिकारांनींही वाढवून, असे वेदविद् ब्राह्मण [ पंडित ] सांगतील तो धर्म समजावा अशी ब्राह्मणांस सत्ता दिली आहे. परंतु प्राचीन ऋषिवर्यांमध्यें जें ज्ञान व सामाजिक हिताविषयीं जी कळकळ होती, ती अलीकडच्या पंडितांत नसल्यामुळें, व खऱ्या धर्मशास्त्राची असावी तशी त्यांस माहिती नसल्यामुळें, त्या सत्तेचा आजपर्यंत फारच थोड्या पंडितांनीं उपयोग करून घेतला. अर्थातच त्यामुळें वेळोंवेळीं धर्मशास्त्रास देशकालाप्रमाणें जें चालन मिळायाचें तें मिळालें नाहीं; म्हणून एकंदर राष्ट्रांत कर्तव्य काय आणि अकर्तव्य काय याचें ज्ञान नाहींसें होऊन विपरीत ज्ञान ठरून राहिलें; व त्याचे भयंकर परिणाम आजपर्यंत काय झाले, व हल्लींही कसकसे होत आहेत, व पुढेंही कसे होतील, हें पुष्कळ विद्वानांस माहीत आहे. मूळच्या स्मृतिकारांनीं जागोजागीं, जसजशी अडचण व संकटें, तसतसा नियमांचा संकोच करण्यांत जी धूर्तता दाखविली आहे. तीमुळें त्यांचें धर्मशास्त्र अत्यंत आदरणीय व सोईचें झालें आहे. उदाहरणार्थ, एकादशीचे उपवास सर्वांस विहित आहेत; परंतु वृद्ध, आतुर ( रोगी ), बाळ व गर्भिणी यांस त्यांचा निषेध सांगितला आहे. सूतक सर्वांना आहे, परंतु राजांना व राजसेवकांना सूतक नाहीं. मद्याचा वगैरे निषेध आहे, परंतु औषधांत व अत्यंत संकटकालांत त्यास प्राणधारणापुरती सवड ठेविली आहे.

फेरफारासंबंधानें बेकनचें अति शहाणपणाचें ह्मणणें आहे तें येणेंप्रमाणें:—" मनुष्यमात्रानें सुधारणांचे बाबतींत नवीन नवीन

वस्तूंचा प्रचार करणारा जो काल त्याचें अनुकरण करावें." कोणत्याही संस्थेचा यत्किंचित् एकदेश अंमळ डळमळीत वाटूं लागला कीं, त्वरित त्या ठिकाणीं वेळच्या वेळीं हळू हळू बेताबातानें, अति अल्पप्रमाणानें कां होईना, सांधण वगैरे लावून तो एकदेश दुरस्त करून टाकावा. आतां इतक्या सूक्ष्म रीतीनें अगदीं दुर्ज्ञेय अशा नादुरुस्त भागाची योग्य वेळीं दुरुस्ती कशास पाहिजे असें कोणी ह्मणेल, तर ती त्याची मोठी चूक होय; कारण जसे अणु अणु मिळून एकादा इमारतीची भिंत झाली असते, त्याप्रमाणें योग्य वेळीं अति सूक्ष्म दुरुस्ती केल्यानें मोठमोठ्या इमारतींचा—एकंदर थोडें थोडें मिळून तिचें मोठें प्रमाण झाल्यानें--सुद्धां नादुरुस्त भाग कधींच न राहून ती सदोदित आहे तशी लोकांस सुरक्षित व भरभक्कम दिसेल. सामाजिक सुधारणांमध्यें अशा प्रकारें धोरण ठेविलें, ह्मणजे लोकांच्या मनाला एकदम धक्का बसविणारे असे मोठमोठे फेरफार करण्याची जरूर पडणार नाहीं. उदाहरणार्थ, वेदशास्त्रपुराणादिक या सर्वांस एकदम फांटा देऊन निवळ सुधारक बनण्यापेक्षां खऱ्या अडचणी कोणच्या आहेत तिकडे लक्ष देऊन बेताबातानें त्या सुधारण्यास यत्न केला असतां, लोकांस ते फेरफार दुःखदायक न वाटतां ते सहज सात्म्य होऊन जातील. युरोपियन लोकांचा सोईवार पोशाख पाहिल्याबरोबर ज्या लोकांनीं पायाच्या बुटस्टॉकिंगापासून विजार जाकिट वगैरे सपशेल ( ह्मणजे डोक्यांतील शेंडी कातरून टाकून अगदीं केश कांतरण्यापर्यंत ) फेरफार केला, त्यांला लोक अनुयायी न मिळतां, ज्यांनीं जोडा वगैरे सर्व ठेवून फक्त बाराबंदी बंडी व जाकिट वगैरे अंगरखे मात्र घातले, त्यांना सहस्रपट जास्त अनुयायी मिळून आतां हिंदुलोकांत तेवढी सुधारणा अगदीं भिनून गेली आहे!

उदाहरण दुसरें—आमचें वैद्यक कुचकामाचें समजून आपल्या कित्येक विद्वानांनीं आपले सर्व दवाखाने एकंदर अथपासून इतिपर्यंत इंग्रजी

औषधांनीं भरून काढिले; व पोटांत दुखलें, हगवण लागली, साधारण कपाळ दुखलें कीं, त्यावर सुद्धां त्यांना इंग्रजी औषधांशिवाय चालत नाहीं. अशा आंग्लमय विद्वानांपेक्षां ज्वरावर क्विनाईन रामबाण औषध आहे, तर तेवढ्याचाच संग्रह आपल्या वैद्यक्रियेंत करावा. अशा प्रकारें जेथें आपल्या औषधांचें अगदीं वैगुण्य दिसलें, त्या-पुरतेच आपल्या औषधिक्रियेंत ज्यांनीं फेरफार सुरू केले, त्यांना विशेष यश आलें. तेव्हां साहजिकच क्विनाईन, क्लोरोडाईन, होमिओपाथीच्या गोळ्या अशीं निवडक औषधें अलीकडे शेंकडों जुने वैद्य व अगदीं भाविक लोक सुद्धां ठेवूं लागले आहेत. सामाजिक सुधारकांनीं वेळोवेळीं धूर्त-पणानें जरूर नाहीं अशा गोष्टी काढून टाकाव्या, व सामाजिक हितास साक्षात्परंपरया आवश्यक अशा नव्या गोष्टींचा संग्रह करावा, हें अतिशय इष्ट आहे, व ह्याप्रमाणें निदान आमच्या आचारविचारांत व धर्मसंबंधांत आजपर्यंतच्या आमच्या अनेक धूर्त चाणाक्ष व दक्ष अशा निरनिराळ्या सुधारकांनीं शेंकडों हजारों सुधारणा करून ठेविल्या आहेत; इतकेंच नव्हे, तर देशकालमानाप्रमाणें ज्यांची कमी आवश्यकता, अशा अनेक गोष्टींना फांटाही दिला आहे, हें सांगण्यास आम्हांस खरो-खर फार आनंद वाटतो. आतां अशा सुधारणा कोणत्या सामील झाल्या, व फांटा कशास मिळाला, याचीं कांहीं उदाहरणें सांगतों:—अतिप्राचीन काळीं **भरतखंडांत** मांसाहाराची प्रवृत्ति बरीच होती, व यज्ञयागांतही पशुहिंसा फार होत असे, हें आपले वेद (तैत्तिरीयसंहिता) व स्मृतिग्रंथ वगैरे, जो कोणी सूक्ष्म रीतीनें दुराग्रह टाकून केवळ सत्यशोधनाचे इ-च्छेनें पाहील, त्याच्या सहज दृष्टीस पडेल. फारा दिवसांची पडलेली ही चाल पाहून पुष्कळ सहृदय तत्वज्ञ विद्वानांस फार वाईट वाटे, परंतु करितात काय ! ज्या वेदग्रंथांचें प्रामाण्य अतिप्राचीन काळापासून लोकां-त ठाम बसलें आहे, तें काढून टाकण्याची त्यांची छाती नव्हती. कारण

वेद झाले ह्मणून काय झाले, त्यांत जरी पश्वादिकांची हिंसा सांगितली असली, तरी "आत्मवत्सततं पश्येत्" या न्यायानें ती अतिनिंद्य होय, असें जे विद्वान् लोक त्या वेळेस ह्मणते, त्यांची आजच्या सुधारकांप्रमाणें समाजांत केवळ फजिती झाली असती; व त्याप्रमाणें ज्या बुद्धजैनांनीं सांगितलें त्यांची फजिती व हाल झालेच. तेव्हां त्या वेळच्या धूर्त व चाणाक्ष विद्वानांनीं असें केलें कीं, वेदाच्या प्रामाण्यास बिलकुल धक्का न देतां वेदाचे टीकारूप ग्रंथ रचण्यास सुरुवात केली, व त्या टीकाग्रंथांमध्यें कांहीं गोष्टी लिहिल्या, त्यांमध्यें **'अहिंसा परमो धर्मः'** हें तत्व बिंबवून दिलें.

यज्ञांत वगैरे जे पशु मारायाचे ते पिष्टाचे करून मारिले असतांही तशा पिष्टपशुमय यज्ञांनीं खऱ्या ह्मणजे प्रत्यक्ष पशुहिंसाप्राय यज्ञाचें फळ मिळतें, ह्मणजे स्वर्गप्राप्ति, धनधान्यपुत्रपशुसंपत्यादिक सर्व मिळतें, असें जेणेंकरून लोकांस वाटेल तशा प्रकारें निरनिराळ्या युक्ति लढवून त्या चाणाक्ष विद्वानांनीं ग्रंथांची रचना केली, आणि पुढें पुढें, पिष्टपशुमय यज्ञांनीं प्रत्यक्ष पशुहिंसाप्राय यज्ञाचें फळ मिळतें, इतकेंच नव्हे, तर हळू हळू पूर्वीं पशु मारीत तेव्हां त्याला ऋषिजन पुनः जिवंत करून सोडीत, व त्याच्या अंगावर जितके केश आहेत तितक्या संख्येचें ब्राह्मणभोजन व दक्षिणा देत; तेव्हां ह्याप्रमाणें पशु पुनः जिवंत करण्याचें, किंवा अंगावरील रोमांइतकें ब्राह्मण-भोजन घालण्याचें सामर्थ्य ज्याला असेल, त्यानेंच प्रत्यक्ष पशुयज्ञ करावा, इतरानें केल्यास महापातकी, वगैरे आख्यायिका पसरून पिष्टपशुमत पुष्कळच फैलावलें. अतिप्राचीन काळीं दर्शपूर्णमासांच्या इष्टींत ह्मणजे प्रति पंधरा दिवसाचे भागांत कूर्म मारण्याची जरूर पडे ( पडत असावी असें अनुमान आहे) ह्याचें विद्वानांस फार वाईट वाटलें, तेव्हां त्यांनीं त्याच्या ऐवजीं प्रतिकृति करून, पिष्टमय पुरोडाशाचें त्याच्या जागीं विधान केलें, आणि अशा रीतीनें ते निदान दर पंधरा दिवसाच्या हिंसेंतून तरी सुटले. श्राद्धाचे

वेळीं पितरांना मांसपदार्थपूरित श्राद्ध पाहिजे, तेणेंकरून ते विशेष तृप्त होतात इत्यादि वचनें मन्वादि स्मृतिग्रंथांत आहेत. विद्वान लोकांना हें जेव्हां वाईट वाटलें, तेव्हां त्यांनीं मांसाच्या ऐवजीं वडे वगैरे प्रतिनिधींची योजना करून श्राद्धाच्या दिवसाची हिंसा पुष्कळ ठिकाणीं बंद केली. अतिप्राचीन काळीं ह्मणजे यज्ञकालांत देवतांस उद्देशून तत्संतोषार्थ तूप वगैरे द्रव्यें अग्नींत अर्पण करीत असत. परंतु ज्ञानकालामध्यें अग्नींत टाकिलेल्या द्रव्यानें ईश्वरतुष्टि न होतां, ते मूल्यवान पदार्थ मात्र व्यर्थ जातात असें दिसून आलें, तेव्हां त्यांनीं उघड निषेध न करितां तोच अर्पण शब्द देवाच्या नैवेद्याकडे लावून देवाला अर्पण करण्याची पद्धति काढिली. वैष्णवांत तर स्वयंपाकाच्या सर्व पदार्थांचा देवाला नैवेद्य व्हावा लागतो. त्या पद्धतीप्रमाणें पंचपक्वान्नें किंवा शेंकडों निरनिराळे स्वादिष्ट पदार्थ देवाला अर्पण करायासाठीं तयार करायाचे; परंतु ते पूर्वींच्या भाविक पद्धतीप्रमाणें देवतोद्देशानें अग्नींत वगैरे अर्पण करायाचे नाहींत, तर फक्त मंडल वगैरे करून देवापुढें ठेवून कांहीं मंत्रांनीं देवाला निवेदन करायाचे, आणि नंतर प्रसाद ह्मणून आपण ग्रहण करायाचे.

त्याचप्रमाणें अतिप्राचीन पुराणांत सनातन वेदोक्त धर्म ह्मटला ह्मणजे त्यांतील देवता वगैरे अगदींच निराळें तंत्र आहे. तेवढ्या देवतांनीं इष्टकार्य भागेना. आपल्या आसपास राहणाऱ्या लोकांना आपला धर्म देत बसावा तर त्यांस फार कष्ट पडणार, बरें, तसें न करितां, जाऊं द्या कीं, आपण आपलाच धर्म पाळूं या, आसपासच्या लोकांचे आचारविचार कांहीं का असेनात, आपणास त्यांची बिलकूल जरूर नाहीं, असें ह्मणणें ह्मणजे विचारदृष्ट्या केवळ असमंजस होय. कारण उघडच आहे कीं, आसपासच्या लोकांच्या

मदतीवांचून समाजयात्रा सुखानें कशी चालेल? व परकीय शत्रूंपासून तरी आपल्या समाजाचें रक्षण कसें होईल? तात्पर्य, आसपासच्या लोकांशीं अगदीं विलग राहणें विचारदृष्ट्या अगदीं गैर होतें. स्मृती-प्रमाणें पाहिलें तर त्याचा रोंख काय तो वर्णत्रयापुरता; जे कांहीं सर्व स्नानसंध्या, वैश्वदेव, ब्रह्मयज्ञ, (स्मृत्युक्त) श्राद्धें, अग्निष्टोम, वरुण, प्रघासा, शुनासीर, साकमेध वगैरे शेंकडो याग, इत्यादि विधि, त्या सर्वांचे अधिकारी वर्णत्रयच. तेव्हां हरतऱ्हेनें आसपासच्या लोकांना आपण यांच्या पेक्षां विधर्मी व परकीय आहों असें न वाटण्यासाठीं सर्वसामान्य धर्माची आवश्यकता प्राप्त झाली. परंतु देशकालवर्तमान वगैरेंकडे बिलकुल लक्ष न देणारे,—व आम्हांस इतराशीं काय करायाचें आहे, बस, आम्हीं आपले आपल्या श्रुत्युक्त धर्माप्रमाणें चालणार असें म्हणणारे,—सामाजिक स्थिति कशीही असो, जुनें आहे त्यांत बिलकुल फेरफार करायाचा नाहीं, व आहे तें उत्तम आहे. असें मानणारे,—महापंडित हजारों होतेच, ते यांच्या आवश्यकतेला काय जुमानतात? तेव्हां अशा महापंडित परंतु विचारांध लोकांची समजूत पाडण्यासाठीं मोठमोठ्या धूर्त, दक्ष आणि चाणाक्ष अशा विद्वान लोकांनीं आसपासच्या राहणाऱ्या लोकांच्या वगैरे ज्या परमपूज्य देवदेवता इत्यादि होत्या, व त्याचप्रमाणें त्यांच्या त्या देवादिकांच्या ज्या शेंकडों हजारों किंबहुना लक्षावधि आख्यायिका वगैरे होत्या, त्या हळू हळू जमवून नंतर त्यांला वैदिक धर्मांत सामील करण्याची योजना केली. लोकांमध्यें परम पूज्य काय ते वेद. त्यांतही शिरोभाग उपनिषदें वगैरे. तेव्हां आतां जें नवीन आसपासच्या लोकांच्या देवतांना पूज्यत्व आणायाचें, तें वरील ग्रंथांच्या आधारावांचून कसें येईल? तेव्हां अर्थातूच त्यांना **नृसिंहतापिनी, गोपालतापिनी, अथर्वशीर्ष रुद्र, तारकोपनिषत्**, इत्यादि **अथर्ववेदोक्त**

व इतर शेंकडों वेदग्रंथ व उपनिषद्ग्रंथ रचावे लागले. प्राचीन धर्माप्रमाणें वर्णत्रयालाच चिकटून रहाणारीं संकुचित नव्हेत, परंतु सर्व वर्णांना ज्यांच्या आचरणाचा अधिकार आहे, अशीं निरनिराळीं शेंकडों–कांहीं नवीन, कांहीं त्यांच्या आसपास राहणाऱ्याच लोकांचीं, वगैरे—व्रतें, यात्रा इत्यादि विधि ( उदाहरणार्थ–शैवांची शिवरात्र, वैष्णवांची एकादशी, गोकुलअष्टमी, रामनवमी, दत्तजयन्ती, दिवाळी, दसरा, नरकचतुर्दशी, इत्यादि शेंकडों सण), व त्यांच्या आख्यायिका, वगैरेंचा समावेश केलेलीं ह्मणायाचीं अष्टादश, परंतु त्यांत पुनः अठरा उपपुराणें वगैरे--अशीं निरनिराळीं पुराणें करून अनेक ग्रंथ रचावे लागले. इतक्यानेंही भागेना, तेव्हां शेंकडों माहात्म्यें तयार करावीं लागलीं, व अशा रीतीनें सहस्रावधि अथवा लक्षावधि देवतांना पुराणादिद्वारें वैदिक धर्मांत गोंवून, तद्द्वारा कोट्यावधि–हल्लींच्या खानेसुमारीप्रमाणें २८कोटि–लोकसंख्येपैकीं बराच मोठा समाज वैदिकधर्मानुयायी केला. नुसता धर्मानुयायी केला इतकेंच नव्हे, तर तेणेंकरून पुष्कळांशीं ऐक्य संपादन केलें. या नवीन भेसळींत निरनिराळ्या धर्मपंथांचे आचारविचार वगैरे एकमेकांस बरेच घ्यावे लागले. याचें अगदीं ठळक उदाहरण ह्मणजे **खंडोबाचें** नवरात्र. मोठमोठ्या पंडितांच्या घरीं सुद्धां हें नवरात्र हल्लीं पाळलें जातें. स्वतः **वैष्णव** असले, तरी **खंडोबासाठीं** कांद्याचे वगैरे पदार्थ करून त्याला अर्पण करावे लागतात. प्राचीन पंडितांनींच या कामीं मदत करून सामाजिक हित केलें असें नव्हे, तर अगदीं अर्वाचीन पंडित वैय्याकरणकेसरी महामहोपाध्याय जे **गोपाळाचार्य**, त्यांनींही **खंडोबा, ह्माळसा** वगैरेंच्या भूषणार्थ कांहीं ग्रंथरचना केली आहे, हें सांगण्यास आह्मांस या स्थळीं फार आनंद वाटतो. तात्पर्य काय कीं, आजपर्यंतचा ह्मणजे प्राचीनतम वेदग्रंथापासून तों **सत्यनारायणापर्यंतच्या** धार्मिक

ग्रंथांचा, इतिहास जो कोणी सूक्ष्म व शोधक बुद्धीनें पाहील, त्याला त्या त्या ग्रंथकारांचें चातुर्य व लोकहितपरायणाता दिसल्यावांचून रहाणार नाहीं. बाकी कित्येक उतावळ्या व अविचारी सुधारकांना पुराणें हीं शिमग्यासारखीं भासतात, हें त्यांच्या अनेक वेळच्या व्याख्यानांवरून कळून चुकलें आहे. त्या ग्रंथकारांना लोकाहितपरायण आम्हीं ह्मटलें त्याचें इतरांस आश्चर्य वाटेल; तें न वाटावें म्हणून आमचा असा ग्रह कां झाला हें सांगतों. ज्या ज्या निरनिराळ्या पंडितांनीं हे ग्रंथ केले, त्यांपैकीं शेंकडों पंडितांनीं हे ग्रंथ केले ते द्रव्यलाभासाठीं केले नाहींत. द्रव्य नसलें तरी मनुष्यें कीर्तीसाठीं रात्रंदिवस परिश्रम करितात; परंतु त्या पंडितांना कीर्तीची सुद्धां जरूर नव्हती, कारण यांपैकीं जे शेंकडों ग्रंथ आहेत, त्यांमध्यें ग्रंथकाराचें नांव मुळींच नसून, ते ग्रंथ त्यांनीं केवळ स्वमतपुष्ट्यर्थ किंवा कांहीं विशिष्टहेतुसिद्धतेस्तवच लिहिले, आणि त्यांवर आपलें नांव न घालितां त्यांचें कर्तृत्व त्यांनीं निष्काम बुद्धीनें **वेदव्यासाला** दिलें. '**अष्टादशपुराणानां कर्ता सत्यवतीसुतः** (अठरा पुराणांचा कर्ता **सत्यवती**चा मुलगा **व्यास** होय). असो; याप्रमाणें निरनिराळ्या पंडितांनीं निरनिराळे ग्रंथ करून हजारों किंबहुना लक्षावधिजातिविशिष्ट **हिंदु**समाजाला एका धर्माखालीं आणण्याचे यत्न केले,त्याचें दिग्दर्शन वर केलेंच आहे; परंतु यांत जें कांहीं वैगुण्य राहिलें, तेंही वेळेवरच सांगितलें पाहिजे. तें वैगुण्य हेंच कीं, ज्याप्रमाणें **मुसलमान** आणि **ख्रिस्ती**लोक वाटेल त्या मनुष्याला कांहीं संस्कार करून आपल्यांत घेतात, तसा प्रकार **हिंदु**-धर्माचा नाहीं. **हिंदूं**चे हजारों लक्षावधि **ख्रिस्ती** झाले,व अगदीं अल्पप्रमाणानें कां होईनात,पण अजूनही **हिंदूंना** ख्रिस्ती करण्याचा यत्न सिद्धीस जात आहे, त्याप्रमाणें अजून आमच्या लोकांनीं मोठ्या प्रमाणानें **ख्रिस्ती, मुसलमान** वगैरे **हिंदु**व्यतिरिक्त लोकांना **हिंदु** करण्यासाठीं संस्था स्थापिल्या नाहींत.

**मुसलमान** लोकांना वैदिकधर्मानुयायी करण्याचें श्रेय **गुजराथेंतील** व **बंगाल्यांतील** **स्वामिनारायण** व **चैतन्य** वगैरे साधूंनीं घेतलें; परंतु अशा संतजनांची संख्या एकंदर हिंदुसमाजाच्या मानानें समुद्रकांठच्या वाळवंटांतील वाळूच्या कणाप्रमाणें आहे. ज्याप्रमाणें शेंकडों पंडितांनीं नवीन ग्रंथद्वारा नव्या वस्तु घेतल्या, त्याप्रमाणें पुष्कळ गोष्टी सोडिल्याही. अग्निहोत्र इत्यादि निरनिराळ्या सूत्रोक्त याग, इष्टि वगैरे हल्लींच्या काळीं किती सार्वत्रिक आहेत, व त्याचप्रमाणें हल्लींच्या लोकांचा आचारविचार व स्मृतिग्रंथांतील आज्ञा, कशा आहेत यांची जो कोणी तुलना करील, त्याच्या दृष्टोत्पत्तीस त्यांचें निदर्शन सहज येणार आहे.

कोणत्याही समाजांतील धार्मिक अगर राजकीय संस्थेंत जे फेरफार होतात, ते त्या समाजांतील लोकांस होणाऱ्या दुःखाच्या प्रमाणानें होतात. अमक्या समाजांत राजकीय अगर धार्मिक क्रान्ति केव्हां होईल हें सांगणें फार कठीण आहे. यासंबंधानें मोठमोठे शहाणे ह्मणविणारे लोक क्रान्तिसंबंधी ज्ञानाची घमेंड राखतां राखतां चुकले आहेत. **फ्रान्स** मध्यें ज्या वेळीं राज्यक्रांतीची सुरुवात झाली, त्या वेळीं **इंग्लंड** देशांत **तालियरांड** नांवाचा एक विद्वान् गृहस्थ होता. तो आपणास मोठा राजकार्य धुरंधर ह्मणवीत असे, व राज्यक्रांतीच्या नियमांविषयीं आपण पुष्कळ अभ्यास केला आहे असें समजत असे. तो त्या वेळीं असें ह्मणूं लागला कीं, आतां थोड्याच दिवसांत **इंग्लंडांतही** **फ्रान्सासारख्या** राज्यक्रांतीस सुरुवात होणार. परंतु खरोखर पाहतां त्या पंडितंमन्य गृहस्थास, ज्याप्रमाणें लोकांवर जुलूम झाला असेल, त्याप्रमाणें लोकांमध्यें प्रतिकृतिकारक आवेश चढतो, हें तत्व माहीत नसल्यानें, त्यानें असें चुकीचें अनुमान केलें. **फ्रेंच** लोकांवर दोनशें वर्षांपेक्षां जास्त वर्षें जुलूम चालला होता, तसा प्रकार इंग्लंडांतील लोकांसंबंधानें नव्हता. तसेंच **फ्रान्समध्यें**

त्या वेळीं नास्तिक मताचा सुकाळ झाला होता, पण **इंग्लंडां**तील लोकांची तशी स्थिति नव्हती. अर्थात् ज्या प्रकारच्या कारणांनीं **फ्रान्सां**त तें कार्य सुरू झालें होतें, तशा प्रकारची कारणसामग्री **इंग्लंडां**त नव्हती. ह्मणूनच **फ्रान्स**च्या राज्यक्रांतींत एका महिन्यांत जितक्या लोकांचे गळे कांपले गेले, तितक्या कांचेच्या खिडक्या सुद्धां **इंग्लंडां**त फुटल्या नाहींत. **फ्रान्स**मधील राज्यक्रांति घडवून आणणारे जे महात्मे होते, त्यांचे हेतु लोकांचीं दुःखें दूर करण्याबद्दल होते, ते एकीकडेसच राहून ग्राम्य लोकांचा समावेश त्या राज्यक्रांतीच्या कारस्थानांत होतांच महान् भयंकर अनर्थ झाले. वास्तविक पाहतां पृथ्वीवरील मनुष्यांनीं स्थापिलेली कोणतीही संस्था अगदीं पूर्ण व दोषरहित आहे असें सिद्ध होणार नाहीं. मग ती धार्मिक असो अगर राजकीय असो. राजकीय संस्थेंत राजसत्ताक राज्य असो, महाजनसत्ताक असो, अगर प्रजासत्ताक असो; तींत दुःखेंही असावयाचींच. त्याचप्रमाणें धार्मिक संस्थेंतही असेंच असावयाचें. तेव्हां विद्वान लोकनायकाचें इतकेंच काम आहे कीं, कोणतीही संस्था जमीनदोस्त न करितां त्याच संस्थेंत सुधारणा करून लोकहित वाढवायाचें. एकाद्या संस्थेंत दोष असला कीं ती नाहींशी करून तिच्या ऐवजीं दुसरी संस्था स्थापन करावयाची, ह्मणजे एकाद्या इमारतींत कांहीं दोष असला कीं सगळी इमारत पाडून त्याऐवजीं दुसरी इमारत बांधण्यासारखें होय. अशा रीतीनें करीत गेलें ह्मणजे घराला पूर्णता कधींच यावयाची नाहीं. कारण जेव्हां पहावें तेव्हां त्यांत कांहीं तरी वैगुण्य असणारच; तेव्हां रोजच्या रोज नवें इमारतीचें काम चालावयाचा प्रसंग यावयाचा! तेव्हां असें करण्यापेक्षां म्हणजे मूळची इमारत न पाडतां तीच वेळोवेळीं दुरुस्त करावी हें ज्याप्रमाणें युक्त होय, त्याचप्रमाणें जुन्या धार्मिक वगैरे संस्थांत कांहीं दोष असले, तरी त्या जमीनदोस्त न करितां त्यांतच सुधारणा करावी हें युक्त आहे.

## मागें सांगितलेल्या निरनिराळ्या गोष्टींविषयीं कांहीं आधार.

### (पृष्ठ ३१) मांसभक्षणाविषयीं.

**यज्ञार्थं ब्राह्मणैर्वध्याः प्रशस्ता मृगपक्षिणः ॥**
**भृत्यानां चैव वृत्त्यर्थमगस्त्यो ह्यचरत्पुरा ॥ १ ॥**

मनु अ० ५, श्लो० २२.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांनीं यज्ञासाठीं आणि अवश्य पोषणाला योग्य असे जे वृद्ध मातापितरादिक यांच्या निर्वाहासाठीं शास्त्रविहित असे मृगपक्षी मारावे. कारण पूर्वी अगस्त्य ऋषींनीं तसें केलें आहे.

**बभूवुर्हि पुरोडाशा भक्ष्याणां मृगपक्षिणाम् ॥**
**पुराणेष्वृषियज्ञेषु ब्रह्मक्षत्रसवेषु च ॥ २ ॥**

मनु अ० ५, श्लो० २३.

ज्यापेक्षां प्राचीनकाळीं आपल्या ऋषींच्या व ब्राह्मणक्षत्रिय यांच्या यज्ञांमध्यें भक्ष्य अशा मृगपक्ष्यांच्या मांसानें पुरोडाश केले आहेत, [ त्या पेक्षां यज्ञासाठीं ह्या काळींही ब्राह्मणादिकांनीं मृगपक्षी मारावे ].

**प्रोक्षितं भक्षयेन्मांसं ब्राह्मणानां च काम्यया ॥**
**यथाविधि नियुक्तस्तु प्राणानामेव चात्यये ॥ ३ ॥**

मनु अ० ५ श्लो० २७.

मंत्रांनीं प्रोक्षित यज्ञहोमाचें शेषभूत मांसभक्षण करावें. ब्राह्मणादिकांना मांसभक्षणाची इच्छा होईल, तर त्या काळीं ( नियमित एकवार) मांसभक्षण करावें. श्राद्धीं व मधुपर्ककाळीं यथाविधि नियमानें मांसभक्षण करावें. प्राणनाशाचा प्रसंग असतां मांसभक्षण करावें.

**मधुपर्के च यज्ञे च पितृदैवतकर्मणि ॥**
**अत्रैव पशवो हिंस्या नान्यत्रेत्यब्रवीन्मनुः ॥ ४ ॥**

मनु अ. ५ श्लो. ४१.

मधुपर्क, यज्ञ (ज्योतिष्टोमादिक), आणि पितृदेवांचें श्राद्धादिक कर्म, यांजमध्येंच पशु मारावे. इतर ठिकाणीं मारूं नयेत.

**एष्वर्थेषु पशुं हिंसन् वेदतत्त्वार्थविद्द्विजः ॥**
**आत्मानं च पशुं चैव गमयत्युत्तमां गतिम् ॥ ५ ॥**

मनु अ० ५, श्लो० ४२.

वेदतत्वार्थ जाणणारा द्विज मधुपर्कादिकांमध्यें पशुहत्या करील, तर तो आपल्या सहवर्तमान पशूला उत्तम गतीला नेतो, ह्मणजे स्वर्गादिक उपभोगांला योग्य अशा विलक्षण देहदेशादिसंबंधाला पोंचवितो.

**या वेदविहिता हिंसा नियतास्मिंश्चराचरे ॥**
**अहिंसामेव तां विद्याद्वेदाद्धर्मो हि निर्बभौ ॥ ६ ॥**

मनु अ. ५, श्लो० ४४.

या स्थावरजंगमात्मक जगामध्यें नियमितपणानें वेदानें सांगितलेली जी हिंसा, ती अहिंसाच जाणावी. कारण वेदापासून धर्म प्रकट झाला आहे.

**नियुक्तस्तु यथान्यायं यो मांसं नात्ति मानवः ॥**
**स प्रेत्य पशुतां याति संभवानेकविंशतिम् ॥ ७ ॥**

मनु अ. ५, श्लो. ३५.

श्राद्ध आणि मधुपर्क यांचे ठायीं यथाशास्त्र नियुक्त असा जो मनुष्य मांस भक्षण करीत नाहीं, तो मृत झाल्यानंतर एकवीस जन्म पशुयोनी-प्रत जातो.

64616

## (पृ० ३२) पिष्टपशूविषयीं.

पुरुषं वै देवाः पशुमालभन्त । तस्मादालब्धान्मेध उदक्रामत् । सोऽश्वं प्राविशत् । तस्मादश्वो मेध्योऽभवत् । अथैनमुत्क्रान्तमेधमत्यार्जन्त । स किंपुरुषोऽभवत् । तेऽश्वमालभन्त । सोऽश्वादालब्धादुदक्रामत् । स गां प्राविशत् । तस्माद्गौर्मेध्योऽभवत् । अथैनमुत्क्रान्तमेधमत्यार्जन्त । स गौरमृगोऽभवत् । ते गामालभन्त । स गोरालब्धादुदक्रामत् । सोऽविं प्राविशत् । तस्मादविर्मेध्योऽभवत् । अथैनमुत्क्रान्तमेधमत्यार्जन्त । स गवयोऽभवत् । तेऽविमालभन्त । सोऽवेरालब्धादुदक्रामत् । सोऽजं प्राविशत् । तस्मादजो मेध्योऽभवत् । अथैनमुत्क्रान्तमेधमत्यार्जन्त । स उष्ट्रोऽभवत् । सोऽजे ज्योक्तमामिवारमत । तस्मादेष एतेषां पशूनां प्रयुक्ततमो यदजस्तेऽजमालभन्त । सोऽजादालब्धादुदक्रामत् । स इमां प्राविशत् । तस्मादियं मेध्याऽभवत् । अथैनमुत्क्रान्तमेधमत्यार्जन्त । स शरभोऽभवत् । त एव उत्क्रान्तमेधा अमेध्याः पशवः । तस्मादेतेषां नाश्नीयात् । तमस्यामन्वगच्छन्त्सोऽनुगतो व्रीहिरभवत् । तद्यत्पशौ पुरोडाशमनु निर्वपन्ति । स मेधेन नः पशुनेष्टमसत्केवलेन नः पशुनेष्टमसदिति । स मेधेन हास्य पशुनेष्टं भवति केवलेन हास्य पशुनेष्टं भवति य एवं वेद ।

स वा एष पशुरेवालभ्यते यत्पुरोडाशः । तस्य यानि किंशारूणि तानि रोमाणि । ये तुषाः सा त्वक् । ये फलीकरणास्तदसृक् यत्पिष्टं किक्नसास्तन्मांसं । यत्किंचित्कंसारं तदस्थि ! सर्वेषां वा एष पशूनां मेधेन यजते यः पुरोडाशेन यजते । तस्मादाहुः पुरोडाशसत्रं लोक्यमिति ।

देवांनीं यज्ञासाठीं पुरुषाचा वध केला. त्याला मारल्यावर मेध त्यांतून निघाला, आणि अश्वांत शिरला, म्हणून अश्वमेध झाला. पुरुषामधून मेध

गेला तेव्हां देवांनीं त्याला टाकून दिलें. नंतर तो किंपुरुष (किं=कुत्सित) झाला. नंतर देवांनीं अश्वाचें आलंभन केलें ( अश्व मारिले ). अश्वाचें आलंभन झाल्यावर मेध तेथून निघाला, आणि बैलांत शिरला. नंतर बैल मेध्य झाला. अश्वांतून मेध निघून गेला, तेव्हां देवांनीं त्याला सोडिलें. तेव्हां त्या अश्वाचा गौर मृग झाला. नंतर बैल, पुढें शेळी, पुढें उंट, पुढें बकरा, पुढें पृथ्वी, नंतर शरभ, या क्रमानें वर सांगितल्याप्रमाणेंच गोष्टी घडल्या. ज्या ज्या पशूंतून मेधाचें उत्क्रमण झालें, ते ते पशु यज्ञास अयोग्य होत, ह्मणून कोणीही त्यांचें मांस भक्षण करूं नये. पुढें मेध पृथ्वींत शिरला. देवांनीं तेथें त्यांस गांठलें, तेव्हां तो व्रीहीमध्यें शिरला. इत्यादि.

तेव्हां पुरोडाश ह्मणून जो ह्मणतात तोच पशु, कीं ज्याचें यज्ञांत आलंभन होतें (ज्याची हिंसा केली जाते). ज्या व्रीहीचा पुरोडाश करितात, त्या व्रीहीचे जे किंशारु ( केशासारखें असतें तें ) ते पशूचे केंस. व्रीहीचे जे तुष, ती पशूची त्वचा. जे बारीक बारीक कण तें रक्त. मळलेलें जें पीठ तें मांस. त्याचेंही जें सार तें अस्थि. ह्मणून पुरोडाशानें याग केला ह्मणजे पशूनें याग केल्याप्रमाणेंच होय, इत्यादि.

कुर्याद्घृतपशुं संगे कुर्यात् पिष्टपशुं तथा ॥
न त्वेव तु वृथा हन्तुं पशुमिच्छेत्कदाचन ॥

मनु अ. ५, श्लो. ३७.

पशुवधाचा प्रसंग असतां घृतानें होम करावा, अथवा पिठाचा पशु करून होम करावा. परंतु वैदिक देवतांच्या उद्देशाव्यतिरिक्त पशु मारण्याची इच्छा कदापि करूं नये.

## (पृ० २९). सूतकाच्या संकोचाविषयीं.

ऋत्विजां दीक्षितानां च यज्ञियं कर्म कुर्वताम् ॥
सत्रिव्रतिब्रह्मचारिदातृब्रह्मविदां तथा ॥ १ ॥

याज्ञवल्क्य अ. ३, श्लो. १८.

दाने विवाहे यज्ञे च संग्रामे देशविप्लवे ॥
आपद्यपि हि कष्टायां सद्यः शौचं विधीयते ॥ २ ॥

याज्ञवल्क्य अ. ३, श्लो. २९.

ऋत्विज, दीक्षित, यज्ञकर्म करणारे, सत्रामध्यें गुंतलेले, व्रती, ब्रह्मचारी, दाते व ब्रह्मवेत्ते यांना, व त्याचप्रमाणें दानांत, विवाहांत, यज्ञांत, युद्धांत, देशावर संकट आलें असतां, भयंकर आपत्ति आली असतां, सद्यःशौचानें शुद्धि होते (तात्कालिक शुद्धि होते).

राज्ञो माहात्मिके स्थाने सद्यः शौचं विधीयते ॥
प्रजानां परिरक्षार्थमासनं चात्र कारणम् ॥

मनु अ० ५, श्लोक ९४.

राजा जोंपर्यंत आपल्या मोठ्या राजपदावर आरूढ आहे, तोंपर्यंत त्याला सद्यःशौच (तात्कालिक शुद्धि) सांगितलें आहे. राजपदावरून च्युत झाल्यावर राजाला सद्यःशौच नाहीं. तात्कालिक शुद्धि असल्याचें कारण असें कीं, त्याची योजना प्रजेच्या रक्षणासाठीं आहे, ह्मणून राजपदावर आरूढ झालेल्या क्षत्रियासच काय, परंतु ब्राह्मणवैश्यशूद्रां-सही तात्कालिक शुद्धीचें विधान आहे.

**महीपतीनां नाशौचं हतानां विद्युतां तथा ॥**
**गोब्राह्मणार्थे संग्रामे यस्य चेच्छति भूमिपः ॥**

याज्ञवल्क्य अ. ३, श्लो. २७.

राजेलोक, किंवा विजेनें मरण पावलेले लोक, किंवा गाई व ब्राह्मण यांच्या संरक्षणार्थ युद्धाचा प्रसंग आला असतां युद्धार्थ जाण्याची ज्यास राजज्ञा होईल असे लोक, यांस सुतक नाहीं.

**डिंबाहवहतानां च विद्युता पार्थिवेन च ॥**
**गोब्राह्मणस्य चैवार्थे यस्य चेच्छति पार्थिवः ॥ ९५ ॥**

मनु अ० ५, श्लोक ९५.

डिंबाहवांत मेलेले ( डिंबाहव=राजावांचूनचें युद्ध ), विजेनें मरण पावलेले, वधाला योग्य अपराधावांचून राजाचे आज्ञेनें मारलेले, या सर्वांचें तात्कालिक अशौच जाणावें; आणि राजा गोब्राह्मणांच्या कार्या-करितांच ज्याला ( पुरोहितादिकाला ) तात्कालिक शुद्धि इच्छितो, त्यालाही तात्कालिक अशौच आहे.



# नौकानयन.

अतिपुरातन काळापासून आमच्या ह्या देशाची संपत्ति व ज्ञान यांसंबंधानें फार ख्याति आहे. पण ज्ञानापेक्षां संपत्तीस भुलणारे फार. याकरितां ती मिळविण्याच्या व साधल्यास ती ज्यांपाशीं होती त्या लोकांस पादाक्रांत करण्याच्या उद्देशानें आमच्या देशावर परस्थांच्या उड्या पडल्या. **इराण**चा बादशहा **दरायस, मॅसिडोनियाचा** राजा **शिकंदर** इत्यादि साहसी पुरुषांनीं, आपल्या अफाट सेना घेऊन, दूरचा प्रवास करून, मार्गांतील अनंत संकटांस व हालांस न जुमानतां, ह्या देशावर ज्या स्वाऱ्या केल्या त्यांचा हेतु इतकाच होता कीं, हा सुपीक व संपत्तिमान् देश काबीज करावा. परंतु त्यांचे ते भगीरथ प्रयत्न कसे व्यर्थ झाले हें इतिहासज्ञांस विदितच आहे. ही ह्या देशाची धनाढ्यता ह्या राजांना अर्थात् व्यापाऱ्यांच्या द्वारें कळली. अत्यंत प्राचीन काळापासून आपच्या देशाशीं परदेशीयांचा व्यापार चालू असल्याची साक्ष ह्या राजांच्या स्वाऱ्या देत आहेत; आणि त्यांनीं एवढे जिवावरचे व कष्टप्रद प्रवास करून अनंत जीवांची आहुति देण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. त्याचें तरी बीज हेंच कीं, इकडून व्यापाऱ्यांनीं नेलेल्या नानाप्रकारच्या चमत्कारिक, अमूल्य, उपयोगी, सुंदर व सुबक चिजा पाहून ते तल्लीन होऊन गेले; आणि अशा मोहक वस्तु ज्या देशांत निर्माण होतात तो देश हस्तगत करण्याची अनावर इच्छा त्यांच्या हृदयांत उद्भवली.

**मिसरी, याहुदी, फिनिशियन, कार्थेजिअन, मूर, अरब** इत्यादि लोक आमच्या देशाशीं प्रत्यक्ष किंवा पर्यायानें व्यापार करून येथल्या

ऐश्वर्याचा लाभ स्वदेशीयांस व इतर **भूमध्य**समुद्राच्या किनाऱ्यावरील राष्ट्रांस करून देत असत. पुढें **रोमन** लोकांनीं ह्या राष्ट्रांस हतवीर्य करून आमच्या देशाशीं जातीनें व्यापार चालविला. त्यांतून **वेनिशियन** लोकांनीं **भूमध्य**समुद्रांतील बहुतेक सगळा व्यापार बळकावून ते अगदीं गबर होऊन राहिले. पण पुढें **पोर्तुगीज, डच,** वगैरे लोकांसही ह्या लोकांची व्यापारमूलक भरभर न साहून त्यांनीं **हिंदुस्थानाशीं** स्वतः व्यापार करण्याचें मनांत आणिलें. ह्या उद्देशानें त्यांनीं **आफ्रिकेस** वळसा घालून **हिंदुस्थानाचा** मार्ग काढण्याचा प्रयत्न चालविला; हा प्रयत्न शेंवटीं **पोर्तुगाल**देशच्या **वासगोदिगामानें** कसा शेंवटास नेला हें सर्व इतिहासज्ञांस ठाऊकच आहे. याच्या अगोदर जगद्विख्यात **कोलंबसानें** पृथ्वी वाटोळी आहे या तत्वाच्या आधारावर एकसारखीं पश्चिमेकडे जहाजें हांकारून **हिंदुस्थानास** जाऊन पोंचण्याची हांव कशी धरिली, आणि तिच्या शेंवटीं बहुतेक सर्व **युरोपास** कसा लाभदायक परिणाम झाला, हें सर्वजनविश्रुत आहे. त्याचप्रमाणें पुढें **गामानें** शोधून काढलेल्या जलमार्गानें **पोर्तुगीज, डच, इंग्रज, फ्रेंच** इत्यादि **युरोपीय** राष्ट्रांतील व्यापाऱ्यांनीं इकडे केवळ व्यापारानिमित्त ह्मणून येऊन पुढें कोणकोणत्या रीतीनें या देशांत आपला रिघाव केला; आणि शेंवटीं **इंग्रजांनीं** आपल्या धूर्तपणाच्या व कांहीं अंशीं बाहुबलाच्या जोरावर बहुतेक सर्व देश आपलासा कसा केला, हें आमच्या देशाचा इतिहास वाचलेल्या सर्वांस चांगलें ठाऊक आहे.

यावरून पाहतां आमच्या देशाचें ऐश्वर्य **युरोपीय** लोकांच्या आधुनिक बहुतेक सुधारणेस प्रत्यक्ष किंवा परंपरेनें पुष्कळ अंशीं कारण झालें आहे, असें ह्मणण्यास फारसा प्रत्यवाय नाहीं. आमच्या देशाची नैसर्गिक संपत्ति, ज्ञान व कला यांचीं अत्यंत मोहक व उपयुक्त फलें

त्यांच्या दृष्टीस पडल्यामुळें तीं प्राप्त करून घेण्याची उत्कट इच्छा त्यांच्या ठायीं उद्भवून ते नाना प्रकारच्या उपायांस लागले; आणि शेंवटीं आमच्या देशावरहि ते सर्व प्रकारें सरशी करून बसले. ह्या त्यांच्या आधुनिक उत्कर्षापुढें आमच्या देशाचें प्राचीन वैभव नामशेष होऊं पाहत आहे. इतकेंच नव्हे तर अलीकडील अर्थशास्त्रज्ञ सांगतात कीं, आमचा देश सुधारलेल्या जगांत अगदीं निकृष्ट प्रतीचा आहे. याचा येथें एकच दाखला देतों. आमच्या देशांतील एकंदर लोकांचें वार्षिक उत्पन्न एकत्र करून तें सर्वांस सारखें वाटून दिल्यास एक एकाच्या वांट्यास अवघे सत्तावीस रुपये येतील; तेंच **युरोपां**तला अत्यंत गरीब जो **रशिया** त्याचें एकंदर उत्पन्न तेथल्या प्रत्येक असामीच्या वांट्यास सरासरीनें आमच्या चौपट ह्मणजे शंभर रुपयांवर येईल. हें येवढें नष्टचर्य जें आमच्या देशास आज प्राप्त झालें आहे त्याचीं कारणें पुष्कळ आहेत. त्यांचा विचार होऊन तीं नाहींतशीं करण्यास झटणें हें प्रत्येक स्वदेशसुधारकाचें कर्तव्य आहे. हा विचार व तदनुसार उपायांची योजना हीं सध्यांच्या काळाला आह्मांस पाश्चात्यांच्या व त्यांतूनहि विशेषतः आमच्या राज्यकर्त्यांच्या संघटनानें सुलभ झालीं आहेत. हीं पाश्चात्य राष्ट्रें आज वैभव व सुख यांचा कमी जास्त प्रमाणानें जो अनुभव घेत आहेत त्यास मुख्य कारण त्यांची संपत्ति होय. ही संपत्ति त्यांस पुष्कळ कलांच्या योगानें प्राप्त झाली आहे. नानाविध संपत्त्युत्पादक कलांचा तिकडे एकसारखा उत्कर्ष होत चालला आहे; आणि ज्या प्रमाणानें शास्त्रीय ज्ञान वृध्दि पावून प्रसृत होत जाईल त्या प्रमाणानें त्यावर अवलंबून असणाऱ्या कलांत नित्य नवे व उपयुक्त फेरफार होऊन संपत्तीच्या उत्पादनास व वांटणीस लागणारा काळ, मेहनत व खर्च ह्यांचें मान कमी कमी होत जाईल; आणि तेवढ्या मानानें सुख व शांति यांचा अनुभव वृध्दिंगत व सार्वत्रिक होत जाईल. तेव्हां आमच्या

ह्या देशाचा अभ्युदय व्हावा असें ज्याला वाटत असेल त्यानें युरोपीय राष्ट्रांची भरभराट मुख्यत्वेंकरून ज्या कलांमुळें झाली आहे त्या कला आमच्या इकडे कशा येतील याचा विचार करणें अवश्य होय. हा विचार आमच्या इकडे थोडा बहुत होऊं लागला आहे, हें आमच्या भावी उत्कर्षाचें सुचिन्ह होय.

ह्या पाश्चात्यांच्या कलांपैकीं एका मोठ्या कलेविषयीं विचार करण्याचा आमचा उद्देश आहे, हें निबंधाच्या शिरोलेखावरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. **नौकानयन** कलेचा विचार आमच्या लोकांस अनेक प्रकारें हिताचा आहे, हें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

बहुतेक पाश्चात्य राष्ट्रांच्या व त्यांतून मुख्यत्वेंकरून आमच्या **इंग्रज** लोकांचा उत्कर्ष व्यापारावर अवलंबून आहे. हा त्यांचा बहुतेक सगळा व्यापार जलमार्गानें होतो. तेव्हां अर्थात् तो चांगला सुरक्षितपणें व होईल तेवढा थोडा काळ व मेहनत लागून व्हावयासाठीं तद्ग्राहक जी **नौकानयन** कला तिची सुधारणा होणें अवश्य होय; आणि त्याप्रमाणें ती त्यांच्या तिकडे पुष्कळ प्रकारें झाली आहे. पूर्वींप्रमाणें त्यांना आतां जगाच्या कोणत्याहि भागांत संचार करण्यास फारशी भीति किंवा त्रास वाटत नाहीं. ही ह्या कलेची सुधारणा तिकडे कशी झाली याचा विचार प्रथमतः संक्षेपानें करूं.

( १ )- **युरोपां**तले बहुतेक देश **हिंदुस्थान, मिसर** इत्यादि देशांप्रमाणें सुपीक नसल्यामुळें तेथल्या वाढत्या लोकसंख्येस दशोंतल्या देशांत उत्पन्न होणारे अन्नादि उपजीविकेचे पदार्थ न पुरून त्यांस इतर देशांकडे पाहावें लागलें. याप्रमाणें बऱ्याच लोकांस मुळीं नित्य निर्वाहाचीच पंचाईत असल्यामुळें त्यांना ऐष आरामीच्या चिजांचा उपभोग फारसा मिळत नसे, ह्मणून इतर देशांतल्या तशा चिजा पाहून त्यांच्या तोंडास

पाणीं सुटून त्या मिळविण्याच्या प्रयत्नास ते लागले हें स्वाभाविक आहे. ही बुभुक्षा किंवा ऐष आरामीच्या चिजांची लालसा हिनें प्रेरित होत्साते ते देशोदेशीं हिंडण्यास प्रवृत्त झाले. कांहीं काळपर्यंत **मिसरी, फिनिशियन, याहूदी, कार्थेजियन, अरब, मूर** इत्यादि व्यापाऱ्यांनीं त्यांच्या देशांशीं व्यापार करून त्यांस हवा असलेला माल पुरविला. पण पुढें ह्या व्यापारी लोकांचे महाग दर व त्यांच्या **शिकंद्राबाद, टायर, कार्थेज, यरुशलेम, बगदाद** इत्यादि ठिकाणची व्यापारमूलक संपत्ति त्यांस न साहून त्यांच्यापैकीं कित्येकांनीं निरानिराळ्या देशांशीं स्वतंत्रपणें व्यापार करण्याचा निश्चय केला. त्यांच्यामध्यें मुख्यत्वेंकरून **विनिशियन** लोक पाहिल्यानें पुढें सरसावले. त्यांच्या मागून **पोर्चुगीज, दच, इंग्रज** इत्यादि राष्ट्रांतील व्यापाऱ्यांनीं देशपर्यटन आरंभिलें.

(२). हें अनेक प्रकारें अत्यावश्यक असें देशपर्यटन त्यांस जलमार्गानेंच करावें लागलें. **युरोपा**चा नकाशा ज्यानें पाहिला आहे त्यास हें सांगायास नको कीं, त्यांतले बहुतेक देश परस्परांपासून व इतर खंडांतील देशांपासून समुद्र, आखातें इत्यादिकेंकरून बहुतेक विलग झालेले आहेत. ह्मणून त्या राष्ट्रांचें परस्परांशीं किंवा इतर राष्ट्रांशीं दळणवळण नौकांच्या साहाय्यावांचून बहुतेक दुरापास्त होतें. यावरून पाहतां फार प्राचीन काळापासून **नौकानयना**चें ज्ञान तिकडील राष्ट्रांस असणें अत्यावश्यक होतें. **ग्रेटब्रिटना**सारख्या बेटाचें तर इतर कोणत्याहि देशाशीं दळणवळण नौकांच्या साहाय्यावांचून कधींच झालें नसतें. ह्मणून तेथले लोक इतर देशांतल्या लोकांपेक्षां विशेष दर्यावर्दी झाल्यास नवल नाहीं. शिवाय भूमध्यसमुद्रापेक्षां **अटलांटिक** महासागरांत वादळें वगैरे फार होत असल्यामुळें **ब्रिटिश** लोक इतर लोकांहून विशेष साहसी व कडवे झाले. आज काल **ब्रिटिश** खलाशांची चोहोंकडे ख्याति आहे तिचें बीज हेंच.

( ३ ). ह्या कलेची सुधारणा होण्यास तिसरें कारण असें झालें कीं, तीस तिकडील देशांतल्या राजांचा आश्रय भरपूर मिळाला. हा आश्रय त्या राजांनीं दोन उद्देशांनीं दिला. एक उद्देश तर उघडच आहे कीं, त्यांला व्यापारापासून होणारा फायदा चांगला दिसून आला. दुसरा उद्देश ह्मटला ह्मणजे परदेशांशीं युद्ध करणें, जलमार्गानें परचक्र आलें असतां तें निवारणें, नवे मुलूख जिंकणें, किंवा शोधून काढून वसविणें इत्यादि प्रकार स्वराज्याच्या रक्षणास किंवा वृद्धीस आवश्यक वाटल्यावरून **नौकानयन** त्यांस अगत्याचें वाटून त्यांत सुधारणा करणारांस ते उत्तेजन देत गेले. मोठमोठ्या सुधारणा ज्या आजमितींत झाल्या आहेत त्या राजाश्रयावांचून बिलकूल होत्याना. बंदरोबंदरीं मोठमोठ्या गोद्या, ठिकठिकाणीं वेधशाळा, दीपस्तंभ इत्यादि बांधण्याचीं कामें, त्याचप्रमाणें जगांतील बहुतेक किनाऱ्यांचे व समुद्राच्या स्थितिविशेषांचे नकाशे बिनचूक तयार करण्याचीं वगैरे कामें खासगी प्रयत्नानें कधींहि चांगलींशीं उरकलीं नसतीं; आणखी तशांत प्रत्येक राजाला थोडें बहुत आरमार स्वराज्यसंरक्षणार्थ ठेवणें प्राप्त झाल्यामुळें त्याला ह्या कलेकडे चांगलेंच लक्ष पुरवावें लागलें. शिवाय व्यापाराच्या किंवा नवे देश शोधून काढण्याच्या उद्देशानें जलपर्यटनें करणारांस त्यांच्याकडून हवा तसा आश्रय मिळत गेल्यामुळें तिकडच्या साहसी लोकांस अर्थतृष्णेस किंवा लौकिकप्रीतीस वश होऊन जिवावरच्या सफरी करण्यास उत्साह व हिंमत आली. तेणेंकरून जगाच्या दूर दूरच्या प्रदेशांत त्यांचा प्रवेश होऊन **नौकानयनास** पुष्कळ उपयुक्त माहिती मिळाली.

( ४ ). धर्मसंबंधाच्या अडचणी त्यांस कोठेंहि जाण्यास आड आल्या नाहींत, हेंहि एक सबळ कारण ह्या कलेच्या वृद्धीस झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. आम्हां हिंदु लोकांप्रमाणें त्यांच्यांत सोंवळ्या

ओंवळ्याचा किंवा खाण्यापिण्याचा प्रतिबंध नसल्यामुळें त्यांना हवें तिकडे जाऊन हवें त्याच्या घरीं खाण्यापिण्यास नड आली नाहीं. आमच्याप्रमाणें त्यांस त्यांच्या धर्मशास्त्रानें समुद्रयानाचा निषेध केला नसून ते परक्यांस तिरस्कारार्ह, अमंगळ व अपवित्र मानीत नसत. त्यांतूनहि त्यांच्या धर्मामध्यें सोळाव्या शतकामध्यें मोठी क्रांति होऊन लोकांस बरेंच विचारस्वातंत्र्य मिळून, हिंदुधर्मातल्या सारखें जें बाह्य आचारांचें जबरदस्त लडथडें त्यांच्या धर्मास जडलें होतें त्याचें मान बरेंच कमी कमी होत गेलें. त्यामुळें त्यांस ऐहिक गोष्टींकडे लक्ष द्यावयास फावलें; आणि केवळ निवृत्तिमार्गाचें बंड इकडच्यासारखें तिकडे फारसें न माजून ऐहिक सुखसंपादनार्थ प्रयत्न करण्याचें मोठमोठ्या बुद्धिमान् पुरुषांनीं मनावर घेतलें. आणि ह्याप्रमाणें तिकडच्या मोठमोठ्या बुद्धि येथल्यासारख्या भासमय आमुष्मिक सुखाच्या भरीं भरून, गिरिकुहरांच्या ठायीं देहदंडनादिकें करून सडून कुजून फारशा नष्ट झाल्या नाहींत, हें त्या महाद्वीपस्थ जनांचें मोठें भाग्यच समजावयाचें.

(९). ह्याप्रमाणें जमिनीचा सुपीकपणा, चांगलें हवापाणी इत्यादि भौतिक साधनांची अनुकूलता त्यांस फारशी नसल्यामुळें ते शोधक, उद्योगी, धाडशी व साहसी झाले. आपणास प्रतिकूल असलेला निसर्ग अनुकूल कसा होईल ह्या विचारांत ते अहोरात्र गढून गेले. निसर्गगत वस्तुजातीचे गुणधर्म समजावून घेऊन, त्यांत जे अनिष्ट असतील त्यांस प्रतिकार कसा करावा व जे इष्ट असतील ते आपल्या कामीं कसे लावावे इत्यादि गोष्टींचा शोध त्यांच्यांतील मोठमोठ्या बुद्धिमान् पुरुषांनीं एकसारखा चालविला. ह्या त्यांच्या प्रयत्नांस आज कोणतीं फळें आलीं आहेत तें सर्व जगास महशूर आहे. त्यांच्या इकडे मोठमोठ्या उपयुक्त शास्त्रांची उत्पत्ति होऊन तीं उत्तरोत्तर वृद्धि

पावत आहेत. त्या शास्त्रांचें साहाय्य त्यांनीं बहुतेक धनोत्पादक कलांस घेतल्यामुळें त्या आज उत्कर्षाच्या स्थितिप्रत पोंचल्या आहेत. ह्या कलांच्या साहाय्यानें ते आजला बहुतेक जगास भारी होऊन राहिले आहेत. इतर कलांप्रमाणें **नौकानयन** कलेसही शास्त्रीय ज्ञानाचें विलक्षण साहाय्य झालें आहे. यंत्रशास्त्र, ज्योतिःशास्त्र, पदार्थविज्ञान-शास्त्र, वायुशास्त्र, भूगोलशास्त्र इत्यादि शास्त्रांची मदत ह्या कलेस हवी तितकी मिळून ती आज जें रूप पावली आहे, तें शंभर वर्षांपूर्वी कोणाच्या स्वप्नींहि आलें नसेल. चौदाव्या शतकापर्यंत तर त्यांचें नौकागमन बहुतेक केवळ किनाऱ्या किनाऱ्यानेंच होत असून स्थल-विशेषीं वाऱ्यांच्या गतींची वगैरे माहिती तत्कालीन दर्यावर्दी लोकांस थोडथोडी असे. पण पुढें होकायंत्राची युक्ति निघून दूरदूरचीं पर्यटनें होऊं लागलीं. **कोलंबस, दिगामा** इत्यादि नौविद्याविशारदांचे तेव्हांच्या लोकांस थक्क करून सोडणारे दूरचे जलप्रवास, हें यंत्र नसतें, तर कधींहि झाले नसते. गेल्या शतकाच्या अखेरीपर्यंत त्यांचीं जहाजें केवळ शिडांच्या साहाय्यानें वाऱ्याच्या धोरणावर चालत असत. ह्या काळपावेतों नौकागमनास यावी तितकी सुरक्षितता आली नव्हती, आणि **नौकान-यनांत**हि ह्मणण्यासारखी सुधारणा झाली नव्हती. पुढें चालू शतकाच्या प्रारंभीं वाफेच्या योगानें जहाजें चालविण्याची युक्ति निघाली. तेव्हांपा-सून ह्या कलेंत यंत्रसाहित्याची अधिकाधिक गरज पडून आणि दुसरींहि उपकरणसाहित्यें भराभर वाढून तींत झपाट्यानें सुधारणा झाली. आज त्यांचीं बरींच गलबतें वाफेच्या साहाय्यानें चालत आहेत. यामुळें त्यांच्या व्यापाराच्या वगैरे सोई फारच चांगल्या वाढून ज्या राष्ट्रांत ह्या कले-चा उत्कर्ष झालेला नाहीं त्या राष्ट्रांवर त्यांचा सर्व प्रकारें पगडा बसत चालला आहे. बहुतेक साऱ्या जगाचा व्यापार तेच बळकावितील असा दृढ संभव आहे. ह्या सर्व पाश्चिमात्य राष्ट्रांत आमच्या **इंग्रज** लोकांची

या कलेच्या संबंधानें प्रमुखत्वानें गणना आहे. त्यांचीं जहाजें आज ज्या देशाच्या किनाऱ्यावर नाहींत असा देश विरळा. ते ह्या कलेंत सुमारें तीनशें वर्षें एकसारखी सुधारणा करीत आहेत. आज त्यांच्या इतकी ह्या कलेंत गति इतरांची फार करून झालेली नाहीं. ह्या कलेच्या उत्कर्षावर त्यांची सर्व भरभराट किंबहुना जीवितहि अवलंबून आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्याप्रमाणें ही कला ज्यांची अगदीं जिव कीं प्राण होऊन राहिली आहे त्यांचे जे आम्ही प्रजाजन त्या आम्हांत तिजविषयीं पुरी उदासीनता वसावी हें आश्चर्य नव्हे काय ? त्यांच्या दीर्घकालिक साहचर्यानें त्यांच्या सर्व उत्कर्षाचें मूळ जी ही कला तिच्या संपादनाविषयीं आमच्या ठायीं कधीं स्पृहा उत्पन्न होऊं नये हें आमच्या कमकुवतपणाचें, किंबहुना अजागळपणाचें दर्शक होय.

कोणी येथें असें ह्मणेल कीं, " **युरोपीय** राष्ट्रांस ही कला अत्यावश्यक व हितप्रद झाली ह्मणून आह्मांसहि ती तशी होईलच असा कांहीं नियम नाहीं. कारण ती जर आमच्या ह्या देशाच्या अभ्युदयास आवश्यक असती तर ती इकडे कधींच सुधारून राहती. प्राचीन काळीं आमच्या ह्या देशाची जी इतकी सुधारणा झाली तीस ही कितीशी साधनीभूत झाली होती? तेव्हां आह्मांला आतांहि तिची फारशी गरज नाहीं. " असा पूर्वपक्ष करणाराचें समाधान दोन प्रकारें आहे. एक तर ही कला आमच्या इकडे उत्कर्ष कां पावली नाहीं हें पहावयाचें; आणि दुसरें ही कला सध्यां आह्मांस अगत्याची कां आहे तें दाखवावयाचें. पहिल्यानें ही कला आमच्या इकडे न सुधारण्याचीं कांहीं कारणें सांगतों.

( १. ) ज्या कारणानें मुख्यत्वेंकरून **युरोपस्थ** लोक हरहुन्नरी व पाताळयंत्री झाले त्याच्या विपरीत स्थिति आमच्या ह्या देशाची होती. हा देश चांगला सुपीक असून हरएक प्रकारच्या पदार्थांच्या उत्पन्नास लायक

अशी जमीन व हवा येथें असल्याकारणानें येथील लोकांस चरितार्थाची फारशी पंचाईत पडत नसे; आणि जेथें थोड्या श्रमानें उपयुक्त चिजांचें विपुल उत्पादन होतें, तेथें सर्व लोकांच्याच पाठीमागें उदरभरणाचा व्याप न लागून कांहीं जणांस फुरसत सांपडते. ह्या फुरसतीचा उपयोग ते इतर व्यासंगांकडे करितात; आणि ह्याप्रमाणें त्यांच्यामध्यें ज्ञान व कला यांची वृद्धि होऊन त्यांचा देश सुधारणेच्या पंथास लागतो. अशी स्थिति आमच्या देशाची असल्याकारणानें इतर राष्ट्रें रानटी अवस्थेंत अज्ञानांत व दारिद्र्यांत खपत असतां आमची भरभर होती. त्यामुळें आमच्या लोकांस असें सहज वाटण्यासारखें होतें कीं, 'काय जी सुधारणा आहे ती आपल्या देशांत; दुसऱ्या कोणत्याहि देशांतून आमच्या उपयोगाचें फारसें कांहीं आढळावयाचें नाहीं; तेव्हां त्यांच्या मुलुखांत जाण्याची आपणास काय गरज? त्यांनीं पाहिजे तर आमच्या देशांत येऊन चांगला मोबदला देऊन हव्या असतील त्या चिजा घेऊन जाव्या. पुढें इतर राष्ट्रांशीं त्यांचा विशेष परिचय झाला तरी हा समज दृढच राहिला; कारण त्यांचा हिशोब असा असे कीं, परदेशस्थांशीं व्यापार, करावयाचा तो केवळ आपलें द्रव्य वाढविण्यासाठीं. आपल्या चरितार्थास किंवा सुखास लागणाऱ्या चिजा त्यांच्याकडून आपणांस फारशा मिळावयाच्या, नाहींत असें, ज्या थोड्याशा भिकार चिजा परकी लोक या देशांतल्या चिजासाठीं मोबदला देण्यास आणीत असत त्या पाहून; त्यांस वाटण्यास जागा होती. तेव्हां त्या न मिळाल्यानें त्यांचें मुळींच अडत नसे. मग त्या सवंग भावानें मिळविण्यासाठीं परदेशांत जाण्याचें त्यांना प्रयोजन वाटलें नाहीं हें उघड आहे.

( २. ) दुसरें कारण, आमचे लोक परस्थांस हीन, अपवित्र व तुच्छ गणीत. त्यांचा स्पर्श झाला असतां सचैल स्नानावांचून शुद्धि नाहीं असें ते समजत. फार काय, पण त्यांची भाषाहि प्राणांत ओढवला तरी बोलूं

नये असें सुद्धां वचन* आहे ! इतका जेथें परकी लोकांविषयीं तिटकारा तेथें त्यांच्या मुलुखांत जाऊन स्वजातिभ्रष्ट व धर्मच्युत होण्याचें साहस करण्यास कोणी फारसे धजले नाहींत, यांत नवल तें कोणतें ? आमच्या धर्मशास्त्रानें तर समुद्रयानास निखालसपणें प्रतिबंध केलेला आहे ! त्यापासून होणाऱ्या पातकास व भ्रष्टतेस प्रायश्चित्त सुद्धां सांगितलेलें नाहीं ! जो ह्या धर्माज्ञेचा भंग करील तो स्वजातिबाह्य व धर्मभ्रष्ट होईल असें आमचे शास्त्रीबुवा अजून निक्षून सांगत आहेत ! **मंडलिक**प्रभृति कांहीं **मुंबापुरस्थ** विद्वान ब्राह्मणांनीं ब्रह्मपरिषद् स्थापण्याचा प्रयत्न चालविला असतां, समुद्रयानमूलक पातकास प्रायश्चित्त देण्याच्या संबंधानें वाद उपस्थित होऊन त्यांचा सर्व व्यूह कसा ढासळला हें ज्याला ऐकून तरी ठाऊक असेल, त्यास हा आमचा मुद्दा किती महत्वाचा आहे हें सहज कळेल. अलीकडे कोठें पाश्चात्त्यांच्या संसर्गानें आणि त्यांनीं पाजिलेल्या ज्ञानामृताच्या योगानें आमच्या ह्या अज्ञानमूलक समजांचा ऱ्हास होऊन आमच्यांतील कित्येक जण परदेशास जाण्यास तयार झाले आहेत. परंतु बहुसमाजाचें मत ह्या गोष्टीस अनुकूल नसल्यामुळें बहिष्कारादिमूलक भीतीनें अजून त्यांस सोडिलेलें नाहीं. यास एकच उपाय आहे. तो हा कीं, जसजशी परदेशीं जाणारांची संख्या वाढत जाईल तसतशी ह्या धर्मशास्त्राज्ञा मोडणारांची संख्या वाढून कोणास तिचें फारसें वाटेनासें होईल. सारांश, परदेशगमनास हा एक जबरदस्त अडथळा आमच्या लोकांना प्राचीन कालापासून असल्याकारणानें या कलेकडे आमच्या लोकांचें फारसें लक्ष गेलें नाहीं.

(३.) तिसरें कारण राजाश्रयाभाव हें होय. जेथें मुळीं परदेशांत न गेल्यानें आमच्या लोकांचें कांहीं एक अडण्यासारखें नव्हतें, आणि शिवाय लोकसमज व धर्मशास्त्र हींहि त्यांस प्रतिकूल होतीं, तेथें राजे

---

* **न वदेद्यावनीं भाषां प्राणैः कंठगतैरपि ।**

लोकांकडून ह्या कलेस उत्तेजन मिळणार कोठून ? तशांत आमच्या ह्या विस्तीर्ण देशांतील निरनिराळ्या प्रांतांचे राजे परस्परांशीं कलह करण्यांत किंवा विलासांत अगदीं गर्क होऊन गेले असल्याकारणानें आपल्या प्रजेच्या हिताच्या गोष्टी कोणत्या हें पाहण्याची त्यांस फार करून सवड किंवा बुद्धि झाली नाहीं. पुढें ह्या देशांत परस्थांचा प्रवेश होऊन त्यांचा चोहोंकडे ताबा बसला. मग तर कांहीं विचारायालाच नको. आमच्या बहुतेक **हिंदु** राजांनीं ब्राह्मणभोजनांत, दक्षिणांत किंवा देवळें बांधण्यांत जसा प्रजेपासून कराच्या रूपानें घेतलेल्या द्रव्याचा व्यय करून आळस व अनाचार वाढविला, तसा **मुसलमान** व **मोंगल** बादशाहांनीं मशिदी व थडगीं बांधण्यांत आपल्या तिजोरींतला पैका बेधडक उधळिला. त्यांच्या राजधान्या समुद्रापासून शेंकडों कोसांवर असल्यामुळें त्यावेळीं समुद्रांतून परस्थांशीं होणाऱ्या व्यापाराचें वगैरे त्यांस फारसें महत्व वाटलें नाहीं, आणि स्वराज्यरक्षणार्थ आरमार ठेवण्याची त्यांस आवश्यकताहि भासली नाहीं. नाहीं ह्मणायाला **मोंगलांचें** थोडेंसें आरमार **सुरते**जवळ असे; आणि आमच्या **मराठ्यांच्या** राज्याचे मूळ स्थापक जे **श्रीशिवाजी**महाराज त्यांनीं कांहीं आरमार ठेविलें होतें. तें त्यांस ठेविण्याचें प्रयोजन वाटण्याचें कारण उघडच आहे कीं, त्यांच्या राज्याचा विस्तार समुद्रकिनाऱ्यावरून असल्यामुळें त्यावर शत्रूचे जलमार्गानें हल्ले होऊन प्रजेस त्रास पोहोंचण्याचा संभव होता. हा कायतो सगळा ह्या कलेस आमच्या इकडे राजाश्रय मिळाला होता, पण त्यामुळें तींत सुधारणा कसली ती बिलकूल झाली नाहीं. मात्र त्या आरमारांच्या व **इंग्रज, पोर्तुगीज** आदिकरून **युरोपीय** आरमारांच्या ज्या थोड्याशा चकमकी झडल्या, त्यांत आमचे लोक त्यांच्याहून कोणत्याहि प्रकारें कमी नव्हते असें दिसून आलें; आणि त्यावरून आह्मांस आज असेंहि ह्मणण्यास हरकत वाटत नाहीं कीं, जर ह्या कलेस आमच्या इकडे पाश्चात्त्यांप्रमाणें तेव्हांपासून एकसारखा

राजाश्रय मिळत गेला असता, तर आह्मी आज तींत फारसें मागसलों नसतों. असो, आतां झाल्या गोष्टीस इलाज नाहीं. यापुढें तरी आपण सावध झाल्यास आमच्या सांप्रतच्या प्रजाजनहितैषी राज्यकर्त्यांचा आह्मांस कदाचित् आश्रय व प्रोत्साहन मिळण्याचा संभव आहे.

**इंग्रज** आदिकरून पाश्चात्त्य राष्ट्रांतील व्यापारी लोकांस त्या त्या राष्ट्रांचा भरपूर आश्रय असल्यामुळें त्यांना पाहिजे त्या बंदरीं जाऊन व्यापार करण्याच्या सोई होत आल्या आहेत. उदाहरणार्थ, **युरोपांतून** आमच्या देशांत व्यापाऱ्यांच्या ज्या मंडळ्या पहिल्यानें आल्या, त्यांना त्यांच्या राजांपासून इकडील राजांवर शिफारसपत्रें मिळालीं होतीं. हा सामोपचाराचा प्रकार झाला. पण एकाद्या देशाच्या राजानें किंवा लोकांनीं त्यांच्या व्यापाऱ्यांस अटकाव केला असतां त्यांचें पारिपत्य करण्यास ते कधीं चुकत नाहींत. असें करण्यास त्यांस सामर्थ्य मात्र पाहिजे. असा कांहीं एक प्रकार आमच्या देशांतल्या राजे लोकांच्या हातून न घडल्यामुळें आमच्या व्यापाऱ्यांस परमुलुखांत जाण्याची हिंमत आली नाहीं. कारण परकी लोकांचा त्यांस धाक वाटणें साहजिक होतें. शिवाय पुढें **मुसलमानी** धर्माचा प्रसार चोहोंकडे होऊन मूर्तिपूजकांविषयीं विलक्षण तिटकारा तद्धर्मी लोकांच्या ठायीं उत्पन्न झाला, त्यामुळें येथील लोकांस भोंवतालच्या यवनमय देशांत जाण्याचें धैर्य झालें नाहीं; मग केवळ विशेष किफायतीच्या आशेनें इकडचा व्यापाराचा माल परदेशांत नेऊन विकण्याची बुद्धि त्यांस कशी व्हावी? आणि जेथें समुद्रोल्लंघन करण्याचीच मुळीं जबरदस्त भीति उत्पन्न झाली तेथें तत्साधक जी **नौकानयन**कला ती कशी ऊर्जित दशेप्रत यावी?

(४.) आणखी एक जबरदस्त कारण या कलेच्या सुधारणेस प्रतिकूल झालें. तें कोणतें ह्मणाल, तर ह्या कलेचा इकडे ज्या थोड्याशा

लोकांनीं आश्रय केला ते बहुतेक अक्षरशून्य होते. आधीं मुळीं आमच्या इकडच्या कलेचें बहुतेक प्राथमिकच स्वरूप पुष्कळ काळपर्यंत कायम असल्यामुळें ती वहिवाटण्यास फारशी बुद्धिमत्ता किंवा विद्वत्ता लागत नसे. सगळा कारभार किनाऱ्या किनाऱ्यानेंच चालत असल्यामुळें तेवढ्या किनाऱ्याची व आसमंतांतील थोड्याशा समुद्राची तुरळक माहिती असून तेवढ्या प्रदेशांत वाहणाऱ्या वाऱ्यांच्या नियत कालिक गति, भरतीओहटींचें मान व नक्षत्रांची ढळढळीत दिसणारी रचना हीं समजलीं ह्मणजे तो झाला नावाडी. तारवावर एकादा माहितगार इसम सुकाणूं फिरविण्यास असला, ह्मणजे बाकीच्या लोकांस फारशी माहिती नसली तरी चाले. ज्याच्या अंगीं थोडेसें धैर्य व चपळपणा हीं असत त्याला तारवाचा तांडेल होण्याची फारशी भीति किंवा पंचाईत वाटत नसे. ह्मणून ह्या धंद्यांत कोणी विशेष बुद्धीचे किंवा शिकलेले पुरुष पडत नसत. आणि ज्या धंद्यांत बुद्धिमान् पुरुष मन घालीत नाहींत, तो धंदा फार करून सुधरत नाहीं असा साधारण नियम आहे. ह्या नियमाची प्रतीति ह्या कलेच्या संबंधानें आमच्या इकडे चांगली आली. आमच्या देशांतल्या ज्या लोकांनीं हा धंदा पतकरिला ते नुसते अक्षरशत्रु होते इतकेंच नव्हे, तर त्यांस साक्षरत्वाचा मुळीं अधिकारच नव्हता! आमच्या धर्मशास्त्रादिकांतून ज्या कित्येक रानटी अवस्थेच्या द्योतक, घातक व लज्जास्पद अनुज्ञा आहेत, त्यांत शूद्र मानिलेल्या वर्गास विद्याध्ययनाचा निषेध करणारी अनुज्ञा अग्रगण्य होय. ह्यासारखा मूर्खपणाचा व देशसुधारणाप्रतिबद्धक नियम दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रांतील धर्मग्रंथांत नसेल. ह्या उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या एका वर्गास सर्वस्वीं अशिक्षित ठेवण्यांत कांहींहि हेतु असो; पण तेणेंकरून आमचा सर्वस्वीं नाश झाला. दारिद्र्य, विपत्ति, पराधीनता इत्यादि अनिष्टांचा हा नियम एक प्रधान कारण मानिल्यास हरकत नाहीं. सारांश काय कीं, पाश्चिमात्त्य राष्ट्रांत धर्मक्रांतीनंतर विद्येचा सार्वत्रिक प्रसार व वृद्धि होऊन तिचा प्रतिषेध कोणासहि राहिल

नाहीं. तेणेंकरून तिकडच्या धनोत्पादक धंद्यांतल्या लोकांस थोडेंबहुत शिक्षण मिळून त्यांस ते सुधारतां आले; आणि ज्या मानानें त्यांचे धंदे सुधरत गेले त्या मानानें आमचे धंदे बसत चालले. कारण, आमचे हस्त-श्रम करणारे लोक बहुतेक कायमचे अज्ञान व अशिक्षित राहिले; आणि सज्ञान व सुशिक्षित लोकांच्या मतें तर हे धंदे अगदीं हलक्या प्रतीचे व अमंगळ! जी इतर धंद्यांची स्थिति तीच आमच्या **नौकानयन**कलेची. ह्मणून ही कला प्राचीन काळीं होती त्या स्थितींतच बहुतेक आहे. पाश्चात्त्यांच्या अलीकडील सुधारलेल्या **नौकानयन**कलेशीं आमची जुनी-पुराणी कला ताडून पाहतां जमीनअस्मानचें अंतर दिसून येतें. अजून तरी या कलेच्या संबंधानें पाहतां पूर्वींच्या वेदाध्ययन किंवा शास्त्राध्ययन केलेल्या ब्राह्मणांत आणि आमच्या अलीकडील उपपदधारी विद्वानांत फारसा फरक दिसत नाहीं. उभयतांमध्येंहि या कलेच्या संबंधानें सारखीच उदासीनता दिसून येते. पाश्चात्त्यांच्या जहाजांवरचे तांडेल पाहवे, तर ते मोठे विद्वान असून त्यांस हा धंदा चालविण्याचे परवाने कांहीं परीक्षा देऊन मिळवावे लागतात. आतां हें खरें कीं, आमच्या इकडील आधुनिक सुशिक्षित मंडळीस ह्या धंद्याची अभिरुचि न लागण्यास त्या धंद्याच्या भासमान नीचत्वाव्यतिरिक्त दुसरींहि कांहीं कारणें आहेत. सारांश, ह्या कलेंत आमच्या सुशिक्षित मंडळीनें मन घातल्यावांचून व त्यांचें तिजकडे लक्ष जाईल असें केल्याशिवाय ही कला इकडे सुधारण्याची किंवा वाढण्याची आशा नको.

येथवर आमच्या इकडे ही कला कां सुधारली नाहीं याचीं कांहीं कारणें सांगितलीं. आतां हिची आवश्यकता आह्मांस कां आहे तें पाहूं.

( १. ) ज्याला आमच्या देशाचा इतर देशांशीं केवढा मोठा व्यापार चालत आहे तें ठाऊक असेल त्याच्या मनांत असला प्रश्न मुळीं यावया-

चा सुद्धां नाहीं. १८८९ सालच्या स्टेट्स्मन्स इअर बुक (Statesman's Year Book) वरून असें कळतें कीं, सगळा आयात व निर्गत माल, खजिना व सरकारी सामान यांची गोळाबेरीज करितां १८८८ सालीं आमच्या ह्या देशाचा इतर देशांशीं १,७०,९७,३७,४५७ रुपयांचा व्यापार झाला; आणि हा व्यापार पुढें एकसारखा वाढत जाण्याचा रंग आहे, असें अनुमान गेल्या दहा वर्षांच्या अंदाजावरून करण्यास कांहीं एक हरकत नाहीं. हा एवढा सगळा व्यापार जलमार्गानें चालला आहे. तेव्हां असा साहजिक प्रश्न उत्पन्न होतो कीं, हा व्यापार ज्या जहाजांतून चालला आहे तीं जहाजें कोणाचीं? या प्रश्नाचाहि निकाल पूर्वोक्त पुस्तकांत लाविला आहे. त्यांत असें सांगितलें आहे कीं, १८८७–८८ सालीं ७१,८९,४६५ टन माल वाहून नेणारीं एकंदर १०,८९३ जहाजें ह्या देशाच्या निरनिराळ्या किनाऱ्यांस लागून गेलीं. त्यांत **ब्रिटिश** लोकांचीं व **ब्रिटिश** वसाहत करणारांचीं मिळून ३,८६९ गलबतें असून त्या सगळ्यांतून ५७,७२,७४७ टन माल जाण्यासारखा होता; खुद्द **ब्रिटिश इन्डियांतील** बहुतकरून **इंग्रज** व्यापाऱ्यांचीं २१२१ जहाजें २,७७,१९७ टन माल नेणारीं होतीं; इतर परदेशीयांचीं १,४७१ गलबतें असून त्यांतून ९,६९,००३ टन माल जाण्यासारखा होता; आणि बाकी येथल्या लोकांचीं छोटेखानी तारवें ३४३२ असून त्यांतून सारा १,७०,५१८ टन माल जाण्याची सोय होती. ह्यावरून हें उघड होतें कीं, खुद्द आमच्याच अशा तारवांतून एकंदर व्यापाराचा सरासरी ४०–४२ वा हिस्सा झाला असून तो, तीं अगदीं लहान असल्यामुळें, जवळच्याच देशांतून झाला असला पाहिजे, वर सांगितलेल्या जहाजांच्या संख्येकडेच फक्त पाहून उपयोग नाहीं. तर त्यांतून जाणाऱ्या मालाचा अंदाज पाहिला पाहिजे. तो पाहिला असतां आणि आमच्या इकडल्या जहाजांची स्थिति ध्यानांत आणिली असतां, आमच्या इकडे त्या कलेचा कितीसा फैलावा झाला आहे

हें चांगलें लक्षांत येईल; आणि जसजशी वाफेच्या शक्तीनें चालणाऱ्या जहाजांची संख्या वाढत जाईल तसतशीं हीं आमच्या लोकांचीं जहाजें कमतींच होत जातील. खुद्द **ग्रेटब्रिटन**चीच स्थिति लक्षांत आणिली असतां आमच्या ह्या ह्मणण्याची प्रतीति सर्वांस येईल. तिकडे शिडांनीं चालणारीं तारवें पुष्कळ आहेत खरीं, पण त्यांची संख्या उत्तरोत्तर कमी होत चालली आहे. १८७८ सालीं तिकडे ५,२३९ जहाजें शिडानें चालणारीं असून १८८७ सालीं त्यांची संख्या फक्त २,७१७ इतकी उरली. तीच वाफेनें चालणाऱ्या तारवांची संख्या तेवढ्या अवकाशांत सुमारें दुप्पट झाली. असे कांहीं आंकडे आमच्या देशाच्या संबंधाचे मिळत नाहींत, तरी पण **रत्नागिरी** जिल्हा, **मलबार**, **कच्छ** व **खंबायत** यांच्या बंदरांतील आमच्या लोकांचीं गलबतें अलीकडे बरींच कमी झालीं आहेत, असें त्या प्रांतांच्या गॅझेटिअरांवरून कळतें. वाफेनें चालणारीं जहाजें करण्यास किंवा वहिवाटण्यास तर आह्मांस मुळींच सामर्थ्य व ज्ञान नाहीं. या वरील निरूपणावरून एक गोष्ट सिद्ध झाली कीं, आमचा बहुतेक व्यापार पाश्चात्त्यांच्या **नौकानयन**कलेच्या जोरावर चालला आहे. आणि यापुढें तर तो सगळाच त्यांच्या हातीं जाण्याचा दृढ संभव आहे. हल्लीं फारकरून किनाऱ्या किनाऱ्यानें कोठें कोठें थोडासा व्यापार आमच्या लोकांच्या तारवांतून चालला आहे. तोहि पुढें शेपर्ड कंपनीच्या आगबोटींसारख्या आगबोटींची संख्या वाढून अगर **कोंकण** रेलवे झाल्यावर अजी बंद होईल अशी भीति आहे. असें झालें ह्मणजे आमच्या सर्व व्यापाराच्या संबंधानें आह्मांस त्यांच्या तोंडाकडे सर्वस्वीं पाहावें लागणार; आणि वहनव्यापारांत होणारी सर्व किफायत त्यांच्या घरांत जाणार आहे.

( २ ). आमचे माजी गवर्नर **सर रिचर्ड टेंपल** हे १८७२ सालीं फिनॅन्स मिनिस्टर ( पोतनीस ) असतां त्यांनीं आमच्या देशांतील आयात

मालापेक्षां निर्गत मालाचें पारडें जड कां या प्रश्नाचा उलगडा पाडण्याचा प्रयत्न केला होता. त्यांनीं ह्या अनिष्ट प्रकाराचीं जीं मुख्य मुख्य कारणें सांगितलीं, त्यांत माल नेण्या आणण्यास पडणारा नोर परक्या राष्ट्रांच्या पदरांत पडतो, ह्या कारणाची प्रमुखत्वानें गणना केली आहे. आयात मालाहून निर्गत माल जितका जास्त आहे त्यांतला सुमारें तृतीयांश ह्या कारणामुळें आहे असा त्यांचा अंदाज आहे. हा त्यांचा अंदाज बहुतेक बेचूक असून आजपर्यंत फारसा बदलला नाहीं असें मानण्यास हरकत दिसत नाहीं. आतां १८८८ सालीं एकंदर आयात माल खजिना वगैरे मिळून ७८,८३,०४,६७२ रुपयांचा होता; आणि निर्गत माल खजिना वगैरे मिळून ९२,१४,३२,७८४ रुपयांचा होता. ह्या निर्गत मालांतून आयात माल वजा करितां १३,३१,२८,१११ रुपयांचा माल राहतो, याचा तृतीयांश काढिला असतां ४,४३,७६,०३७ रुपये होतात. हा एवढा पैसा आह्मांस नोरादाखल परकीयांस द्यावा लागतो. यावरून आमची व्यापारसंबंधी स्थिति चांगली दर्शित होते. आमच्या ब्रिटिश लोकांच्या देशाची या आयातनिर्गत मालाविषयींची स्थिति पहाल तर ती आमच्याहून अगदीं उलट आहे. १८८८ सालीं त्यांच्या आयात मालाची किंमत ३८,६९,८२,०२६ पौंड असून निर्गत मालाची अवघी २९,८३,४७,३८४ पौंड होती. यावरून पाहतां निर्गत मालाहून आयात माल सरासरी नऊ कोट पौंडांचा जास्त होता. हा एवढा अधिक असण्याचीं कारणें पुष्कळ असतील. पण त्या सर्वांत मुख्य कारण ह्मटलें ह्मणजे त्यांचा स्वतःचा, त्यांच्या वसाहतींतला, हिंदुस्थानचा आणि इतर कांहीं देशांतला बराच व्यापार त्यांच्या जहाजांतून होतो, हें होय. तेव्हां आमचा स्वतःचा वहनव्यापार थोड्यानाथोड्या अंशानें तरी आमच्या हातीं आल्यानें आमचा पुष्कळ फायदा होण्यासारखा आहे, हें उघड आहे.

(३). सध्यां आमची लोकसंख्या वाढत जाऊन पोटाच्या धंद्यांची वाण बऱ्याच लोकांस पडत चालली आहे. ती हा नौकानयनाचा धंदा इकडे वाढल्यानें अंशतः तरी कमी होण्याचा संभव आहे. त्याचप्रमाणें युरोपांतल्या बहुतेक देशांत तारवें बांधण्याचे व दुरस्त करण्याचे मोठमोठे कारखाने असून त्यांत हजारा माणसांचा उदरनिर्वाह चालला आहे. तसे कांहीं कारखाने इकडे नाहींत. नाहीं ह्मणायाला सध्यां मुंबई, कलकत्ता, रंगून वगैरे ठिकाणीं गोद्या असून त्यांतून तारवें दुरुस्त करण्याची कामें चालू आहेत. परंतु नवीं तारवें बांधण्याचें काम कोठेंच चांगलेंसें चालत नाहीं. अलीकडे कलकत्याजवळ एक आगबोट निवळ एतद्देशीय लोकांनीं बांधून तयार केल्याचें वर्तमान ऐकतों. तें खरें असल्यास हा स्तुत्य उद्योग करणारांचें सर्व हिंदुस्थानवासी जनांनीं अभिनंदन करणें उचित होय. पण अशीं शेंकडों हजारों तारवें बांधण्याचें काम इकडे चालू झालें पाहिजे. १८८८ सालीं २१२१ ब्रिटिश इन्डियन जहाजें ह्या देशाच्या व्यापारांत गुंतलीं होतीं ह्मणून वर एके ठिकाणीं ह्मटलें आहे. तीं सारीं जहाजें विलायतेच्या गोद्यांतून तयार होऊन आलेलीं होतीं. असे तारवें बांधण्याचे कारखाने इकडे जागोजाग घातल्यानें लोकांस रोजगार मिळून त्यांची पोटाची निवंता कांहींशी दूर होईल. पुष्कळ लोहार, सुतार, विसाडी, फिटर इत्यादि हस्तश्रम करणाऱ्यांस काम लागून पुष्कळ नवे लोकहि त्या धंद्यांत शिरतील. कारण आमचे पूर्वींचे जातिभेदमूलक खुळे समज बरेच कमी होऊन पोटाची खळी भरण्यासाठीं पाहिजे त्यानें पाहिजे तो प्रामाणिकपणाचा धंदा केल्यास हरकत नाहीं, अशीच बहुतेक लोकांची समजूत होत चालली आहे.

(४). ह्याप्रमाणें आमच्या लोकांनीं घालून चालविलेल्या कारखान्यांत आमच्या इकडच्याच मालमसाल्यानें बांधिलेलीं तारवें आमच्याच लोकांनीं चालविलीं असतां आज जी नोराच्या रूपानें पुष्कळ रक्कम

खर्ची पडून व्यापारांत होणाऱ्या किफायतीचें मान अगदीं अल्प आहे ती कमी पडून आमच्या व्यापारास तेजी येईल. सध्यांचा पाश्चात्यांचा वहनव्यापार फार महाग असण्याचें कारण असें आहे कीं, तिकडील गोद्यांतून व तारवांवरून काम करणाऱ्यांचा मुशाहिरा फार मोठा असतो. तेंच हे कारखाने व जहाजें जर आमच्या लोकांनीं चालविलीं तर तीं थोडक्या खर्चानें चालून नोराचें मान बरेंच कमी होईल. कारण आमच्या इकडील मजुरीचा दर त्यांच्याहून फारच कमी आहे. हा मजुरीचा दर कमी असण्यास पुष्कळ कारणें आहेत. त्यांत मुख्य दोन आहेत. एक, मजुरांची संख्या आमच्या इकडे सारखी वाढत असून त्या सर्वांस पुरेसा धंदा मिळण्याची सोय नसते; आणि दुसरें, आमच्या इकडे सामान्य लोकांच्या खाण्यापिण्यास वगैरे खर्च तिकडच्याहून फारच कमी लागत असल्या कारणानें आमचे लोक थोड्या वेतनानें संतुष्ट असतात. ह्या गोष्टींकडे आमच्या ब्रिटिश भांडवलवाल्यांनींहि लक्ष देण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें आमच्या इकडच्या शेटसावकारांनीं व क्वचित् ठिकाणीं राजेरजवाड्यांनीं जसे कांहीं गिरण्यासारखे मोठमोठे कारखाने घालून इकडच्या कारागीर लोकांस काम मिळवून देऊन स्वतःहि गबर होऊन बसले आहेत, तशीच हीहि गोष्ट ते मनावर घेतील तर पुष्कळ फायदा होईल. सारांश काय कीं, आयातनिर्गत मालावर जबरदस्त नोराचा बोजा चढून जी त्याची किंमत वाढते ती जेणेंकरून कमी होईल तें करणें जर आमच्या व्यापाराच्या उत्कर्षास व तन्मूलक राष्ट्रहितास आवश्यक आहे, तर ह्या कलेचा आमच्या इकडे प्रसार करणें अगदीं अगत्याचें आहे.

ह्या झाला जड संपत्तिविषयक लाभाचा विचार. आतां ह्या कलेच्या प्रसारानें आम्हांस शारीरिक व मानसिक लाभ काय काय होणार आहेत तें पाहूं.

( १ ). पहिला लाभ तर आधुनिक सर्व सुधारलेल्या हस्तश्रमांच्या धंद्यांनीं साधारणतः होण्यासारखा आहे. तो असा कीं, ह्या कलेच्या योगानें आमच्या थोडें बहुत शिकलेल्या होतकरू मंडळीचें लक्ष अंगमेहनतीच्या कामाकडे लागून त्यांची शारीरिक उन्नति होईल. कारण असें पाहा कीं, ज्या धंद्यांत मानसिक व शारीरिक अशा दोन्ही प्रकारच्या शक्तीचें कमी जास्त प्रमाणानें प्रयोजन पडून आणखी पुनः वेतनहि चांगलें मिळतें, त्या धंद्यांत शिकलेल्या लोकांस पडण्यास फारशी पंचाईत किंवा दिक्कत वाटत नाहीं. आधुनिक बहुतेक संपत्युत्पादक कला ह्याच प्रकारचें स्वरूप पावल्या आहेत. **नौकानयन**कला तर या सर्व कलांत ह्यासंबंधानें अग्रगण्य आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

( २ ). ह्या कलेच्या प्रसारानें होणारा दुसरा फायदा ह्मटला ह्मणजे आमच्या इकडील शास्त्रीय ज्ञानाची अभिवृद्धि होईल, हा होय. ह्या कलेला अनेक मोठमोठ्या शास्त्रांचें सहाय लागतें. त्या शास्त्रांचें अध्ययन चांगल्या प्रकारें झाल्याविना ही कला चांगली वहिवाटतां येत नाहीं. ह्यासाठीं अशीं शास्त्रें शिकण्याच्या सोई होऊन ती शिकून पुष्कळ लोक तयार होतील. दुसरें असें कीं, ह्या शास्त्रांचा दुसऱ्या कित्येक कलांशीं संबंध असल्यामुळें त्याहि इकडे ऊर्जित दशेप्रत पोंचून धनोत्पादनास पुष्कळ मदत होईल, ती निराळीच.

( ३ ). आणखी तिसरा एक फायदा ह्या सदराखालीं असा सांगावयाचा कीं, तारवें चालविण्याच्या धंद्यांत पडलेल्या लोकांच्या अंगीं साहस, धैर्य, सहनशक्ति, आज्ञाधारकपणा, जागरूकता, चपळता इत्यादि उपयुक्त गुणांची वृद्धि होईल. हे गुण त्यांच्या अंगीं मुळचे बीजरूपानें असल्यास वाढतील, हें तर आहेच. पण मुळचे नसले तरी ते, ह्या कलेंत लागणाऱ्या त्यांच्या जरूरीमुळें, उत्पन्न होऊन वृद्धि पावण्याचा संभव आहे.

ही मानसिक उन्नति इष्ट असून तत्संपादक उपायांचा अवलंब करणें अगत्याचें आहे. यास्तव या कलेकडे आमच्या लोकांनीं बिलकूल दुर्लक्ष करितां कामा नये. पूर्वी चौहोंकडे कलह, लढाया इत्यादि धामधुमीचे प्रकार चालू असल्यामुळें ह्या गुणांची जरूरी बहुतेकांस पडून ते त्यांच्या ठायीं बरेच वसत असत. पण ही स्थिति आतां या ब्रिटिश सरकारच्या अमदानींत अगदीं बदललेली आहे. ह्मणून ह्या पूर्वोक्त गुणांस व त्यांतून विशेषतः मर्दुमकीच्या गुणांस तूर्त फारसा अवकाश उरलेला नाहीं. ही उणीव कमी करण्यास योग्य उपाय योजणें हिताचें आहे. **नौकानयन** कलेचा प्रसार झाल्यास ही उणीव बरीच दूर होईल.

( ४ ). आतां आणखी एक फायदा ह्या कलेच्या प्रसारानें होण्यासारखा आहे. तो आमच्या धर्मसंबंधानें होय. ह्या धंद्यांत चांगले चांगले लोक शिरून निरनिराळ्या देशीं जाऊं लागले ह्मणजे अर्थात् आमच्या लोकांच्या परदेशगमनास प्रतिकूल समजुती पुष्कळ अंशीं कमी होऊन बरेच लोक देशाटनास उद्युक्त होतील. दुसरें असें कीं, आमच्या लोकांनीं चालविलेल्या जहाजांतून जाण्यास आमच्या लोकांना विशेष सोईचें होईल. कारण आज कित्येक लोक विलायतेस वगैरे जातात त्यांस पाश्चात्यांच्या चालीरीतीच्या व खाण्यापिण्याच्या भिन्नत्वामुळें पुष्कळ त्रास सोसावा लागतो. तो इतका कीं, तो ऐकूनहि कित्येकांच्या अंगावर शहारे येतात, व त्यांच्या ठायीं परदेशीं जाण्याविषयीं असलेला थोडाबहुत हुरूपहि नाहींसा होतो. यास्तव आमच्याच लोकांनीं चालविलेलीं जहाजें असलीं ह्मणजे असली कांहीं एक हरकत उरणार नाहीं.

येथपर्यंत आमच्या इकडे **नौकानयन**कलेची विशेष सुधारणा होऊन चांगल्या लायक लोकांच्या अभ्यासाचा विषय ती झाली असतां जे फायदे होण्यासारखे आहेत त्यांतले कांहीं सांगितले. यापुढें आणखी

एका प्रकरणाचा उलगडा करून ही कला इकडे सुधारण्याचा कांहीं उपाय सांगूं.

कित्येक पाश्चात्य व इकडील लोकांचें असें ह्मणणें आहे कीं, **नौकायनासारख्या** कलेस आवश्यक असे जे कित्येक गुण आहेत त्यांचा ह्या देशांतल्या लोकांच्या ठायीं बहुतेक अभाव असल्यामुळें ते ही कला वहिवाटण्यास नालायक आहेत. हें ह्या लोकांचें ह्मणणें बहुतेक खोटें आहे. धैर्य, साहस, सहनशक्ति, जागरूकता, आज्ञाधारकपणा, नियमितपणा इत्यादि गुणांचा आमच्या लोकांच्या ठायीं निखालसपणें अभाव आहे, हें ह्मणणें भ्रममूलक होय. ह्या लोकांना आमच्या देशांतल्या निरनिराळ्या लोकांचें खरें स्वरूप चांगलें ठाऊक नसून आमच्या जुन्या इतिहासाविषयींचें त्यांचें अज्ञान दर्शित होतें. ह्या लोकांची पहिली चुकी अशी आहे कीं, ते ह्या विस्तीर्ण देशांतल्या एकाद्या प्रांतांतील लोकांचे किंवा त्यांच्यांतील एकाद्या विशेष वर्गाचे गुणदोष लक्षांत आणून सगळ्या देशाविषयीं अनुमान बांधतात. पण असलें अनुमान बिलकूल सत्य नव्हे. आमच्या देशांतील कांहीं लोक जात्या भित्र्या स्वभावाचे असले ह्मणून सर्वच लोक तसे आहेत असें कसें ह्मणतां येईल ? आमच्या देशांतील लोकांच्या स्वभाववैचित्र्याचा अनुभव, आजपर्यंत आमच्याशीं ज्या परक्या लोकांचा संबंध पुष्कळपणीं घडला आहे, त्यांस बराच आला आहे; आणि कित्येक वेळां तर तो त्यांस अगदीं थक्क करून टाकण्यासारखा, किंबहुना गांगरवून टाकण्यासारखा आला आहे. त्याचें एक उदाहरण या विषयाच्या संबंधाचें आहे ह्मणून येथें देतों. सतराव्या शतकांत युरोपीय लोकांनीं इकडे व्यापाराच्या निमित्तानें येऊन जागोजाग वखारी घातलेल्या असत. **सुरत, मुंबई, गोवें, दमान** इत्यादि स्थळीं **इंग्रजी पोर्तुगीज,** वगैरे लोकांच्या मोठमोठाल्या वखारी असत. त्या वखारींत वेळोवेळीं

**युरोपांतून** मोठमोठीं जहाजें नानाप्रकारचा माल घेऊन येत, व येथला माल भरून घेऊन परत **युरोपास** जात. हीं जहाजें **रत्नागिरी व कुलाबा** ह्या जिल्ह्यांच्या दरम्यान चांचे लोक लुटीत असत. आमच्या **शिवाजी** महाराजांचें एक आरमार होतें, असें आम्हीं वर एके ठिकाणीं ह्मटलें आहे. हें आरमार ठेवण्याचे त्यांचे दोन हेतु असावे. एक परकीयांपासून स्वराज्यरक्षण व्हावें, आणि दुसरा **अरब, युरोपीय** वगैरे लोकांची व्यापारासाठीं फिरणारीं तारवें लुटावीं. हें चांचेपणाचें काम करण्यास किती धाडस, साहस व जोम पाहिजे याची कल्पना कोणासहि सहज करितां येईल. शिवाय **इंग्रज, पोर्तुगीज** अशा त्या वेळच्या **नौकानयनकलेंत** प्रवीण असलेल्या लोकांशीं गांठ असे. आमच्या **शिवाजींच्या** आरमाराचा मुख्य **आंग्रया** असे. ह्या **आंग्र्यांत** ज्याचें नांव मुख्यत्वेंकरून इतिहासांत गाजत आहे, तो **कानोजी आंग्र्या** होय. यानें मुंबईपासून **त्रावणकोरापर्यंतच्या** किनाऱ्यास लागणाऱ्या बहुतेक जहाजांस लुटण्याचा क्रम बहुशः अप्रतिहतपणें चालविला होता. ह्या **कानोजी आंग्र्यावर पोर्तुगीज** व **इंग्रज** लोकांनीं आपलीं जहाजें एकत्र करून दोनदां स्वारी केली. पण त्यांचें त्यानें कांहीं एक चालू दिलें नाहीं. शिवाय **इंग्रजांनींहि** स्वतंत्रपणें एक दोन वेळां त्याचा नाश करण्याचा प्रयत्न केला, पण तो सगळा व्यर्थ गेला. असाच एकदा **डच** लोकांनींहि प्रयत्न केला होता, पण त्यांनाहि त्यांत मुळींच यश आलें नाहीं. असा हा बलिष्ट **आंग्र्या** सर्व व्यापाऱ्यांच्या जहाजांस खट होऊन राहिला होता. त्याच्यापासून उपद्रव होऊं नये ह्मणून **इंग्रज** व **पोर्तुगीज** लोकांस मोठीं आरमारें नेहमीं जयत ठेवावीं लागत. पुढें **कानोजी आंग्र्या** मेल्यावर त्याच्यामागून त्याच्या मुलांनीं त्याचेंच व्रत कांहीं दिवस चालविलें होतें. पण पुढें पेशव्यांच्या मसलतीनें **इंग्रजांनीं आंग्र्याचा** मोड करून त्याचे बहुतेक किल्ले सर केले. यावरून पाहतां आमच्या इकडच्या

कांहीं लोकांत तरी पूर्वी ह्या कलेस पाहिजे असलेल्या बहुतेक गुणांचा नांवाजण्यासारखा विकास झाला होता. आतां ह्या कुशलतेचा त्यांनीं फार वाईट रीतीनें उपयोग केला हें खरें, तरी नुसतें गुणांच्या दृष्टीनें पाहतां त्यांची तारीफच केली पाहिजे. येथें कोणी अशी शंका घेईल कीं, हे गुण पूर्वी एक वेळ क्वचित् कोठें दृष्टीस पडले म्हणून आतां ते आमच्या लोकांचे ठायीं असण्याचा किंवा उत्पन्न होण्याचा संभव कल्पिण्यास काय आधार आहे? अशी शंका घेणारास हल्लींच्या वस्तुस्थितीचें थोडेसें ज्ञान झाल्यास त्याची ही शंका उरणार नाहीं. आमच्या बंदरकिनारच्या लोकांस ही **नौकानयना**ची कला अति प्राचीन काळापासून थोडीशी अवगत असून त्यांचा इतर दर्यावर्दी लोकांशीं व्यापाराच्या निमित्तानें परिचय व कोठें कोठें सहवासहि झाल्यामुळें त्या कलेंत त्यांची गति विशेष होण्याचा मार्ग झाला होता. त्यांतून मुख्यत्वेंकरून **मलबार, कच्छ, खंबायत,** इत्यादि ठिकाणच्या खलाशांची तर अतिशयित ख्याति आहे. ते मागल्या काळच्या इतर कोणत्याहि दर्यावर्दी लोकांहून **नौकानयन**-कलेंत कमी निष्णात नव्हते. **सर उइलिअम हंटर** आपल्या **हिंदुस्थान**-च्या वर्णनांत तर ह्या ठिकाणच्या नावाडी लोकांस उपजत खलाशी ह्मणतात. अजून तरी येथले खलाशी आपल्या धंद्यांत अगदींच मागसले आहेत असें नाहीं. पुष्कळांचीं अद्यापि लहानसान जहाजें आहेत. हीं त्यांचीं जहाजें शिडांचीं असून बहुतेकांस होकायंत्राचा उपयोग करितां येतो. अलीकडे वाफेचीं जहाजें इकडे अधिकाधिक चालू झाल्यापासून त्यांचा धंदा बसत चालला आहे. त्यांच्या तारवांना आतां पूर्वीप्रमाणें माल न मिळून तारवें बांधून त्यांवर नोकर वगैरे ठेवण्यांत जें भांडवल खर्ची पडतें त्याचा मोबदला त्यांस अगदीं अल्प प्रमाणानें सुटत आहे. त्याचप्रमाणें देशांत चोहोंकडे आगगाड्या होऊन बहुतेक व्यापाराचा माल त्यांच्या योगानें **कराची, मुंबई, कलकत्ता** वगैरे ठिकाणीं जातो,

आणि तेथून तो इंग्रज वगैरे परकीयांनीं चालविलेल्या मोठमोठ्या जहाजांतून परमुलखीं जातो. ह्याप्रमाणें ह्या खलाशांचा स्वतंत्र धंदा बसत चालला आहे, तरी त्यांना परकीयांनीं बांधलेल्या मोठमोठ्या जहाजांवरून नोकऱ्या मिळण्यास फारशी पंचाईत पडत नाहीं. इकडे जीं युरोपीय लोकांचीं शिडांचीं किंवा वाफेचीं जहाजें चालू आहेत त्यांवर हे लोक पुष्कळ दिसतात. त्यांस युरोपीय लोक लस्कार असें ह्मणतात. ह्या लस्काराच्या उपयुक्ततेची व धाडस, जोम वगैरे गुणांची ख्याति पुष्कळ युरोपीय नौकानायकांनीं वर्णिली आहे. त्यांतल्या कित्येकांचें तर असें सानुभव स्पष्ट ह्मणणें आहे कीं, जेथें युरोपांतले कसलेले खलाशीहि गांगरून जातात तेथें ह्या लस्कारचें प्रसंगावधान, शौर्य, सहनशक्ति इत्यादि गुण त्यांस सहसा सोडीत नाहींत. शिवाय ह्या लस्काराच्या आहारविहाराचा नेमस्तपणा, निःसीम स्वकार्यदक्षता व साळसूदपणा ह्या गुणांच्या संबंधानें बहुतेक युरोपीय खलाशांवर वरचश्मा आहे. मुंबईसारख्या शहरांत युरोपीय खलाशी आले ह्मणजे ते मद्यपानादिकांचा जो धुमाकूळ उडवून देतात, तो ज्यांस माहीत असेल त्यांस हें वरील मत अत्युक्तिरूप वाटणार नाहीं. ह्या लस्काराला युरोपीय तारवांवर बहुतकरून साधारण प्रतीचींच कामें मिळतात. त्यांचा मुशाहिरा दहा बारा रुपयांपासून तों तीस पस्तीस रुपयांपर्यंत असतो; शिवाय थोडासा भत्ता मिळतो. हा पगार अर्थात् त्यांस त्यांच्या कामाच्या कमीजास्त योग्यतेप्रमाणें मिळतो. आतां मोठमोठीं जोखमाचीं व जबाबदारीचीं कामें यांना मिळत नाहींत याचें एक तर कारण उघड आहे कीं, त्यांना लिहितां वाचतां फारसें न येऊन मनाच्या निरनिराळ्या शक्ति विकसित करणारें शिक्षण त्यांस मिळालेलें नसतें. दुसरें, त्यांच्यापैकीं कित्येकांच्या अंगीं कांहीं चांगलीं चांगलीं कामें वहिवाटण्याची योग्यता असूनहि त्यांचा पुरस्कार करण्याची बुद्धि युरोपीय नौकानायकांस

होत नाहीं; कारण त्यांस स्वदेशीयांस बढती, आश्रय व उत्तेजन द्यावयाचें असतें. हा पक्षपात नसता, तर आजला आमच्या इकडील कित्येक खलाशी युरोपीय खलाशांशीं पुष्कळ प्रकारें बरोबरी करण्यास समर्थ झाले असते. तेव्हां एकंदरींत काय कीं, योग्य शिक्षण व प्रोत्साहन मिळाल्यास आमच्या देशांत चांगले हुशार खलाशी निपजणें कोणंत्याहि प्रकारें अशक्य नाहीं.

येथवर फक्त आमच्या इकडील लोकांच्या ठायीं नौकानयनास आवश्यक गुणांचें वास्तव्य कितपत होतें किंवा आहे, याचा विचार झाला. आतां हे गुण ज्या कित्येकांच्या अंगीं अल्पप्रमाणानें असतील किंवा मुळींच नसून तद्विरुद्ध दोषांचेंच आधिक्य असेल, त्यांच्या ठायीं ह्या गुणांची वृद्धि किंवा उत्पत्ति स्वभावींच अशक्य आहे किंवा कसें याचा विचार करूं.

ज्यांच्या ठायीं हे गुण बीजरूपानें आहेत त्यांचे ते, योग्य संधि, सोई व उत्तेजन मिळाल्यास, वाढणार नाहींत असें कोण ह्मणेल? आमच्या लोकांस अत्यंत परतंत्रतेची स्थिति प्राप्त झाल्यामुळें आमच्या अंगचे मर्दुमकीचे बहुतेक गुण मावळत जाऊन परावलंबन, हलगर्जीपणा, उदासीनता, बावळेपणा, भ्याडपणा इत्यादि दोषांचे आह्मी माहेरघर बनलों आहों. या स्थितीस कांहीं तरी योग्य प्रतिकार होणें इष्ट आहे. हा अनेक प्रकारें होण्यासारखा आहे. मागल्या काळीं जसे युद्धादि प्रसंग चोहोंकडे सुरू असून शौर्यादि गुणांची बऱ्याच लोकांस आवश्यकता वाटे, तसें कांहीं आतां होण्याचा फारसा संभव नाहीं; व असली स्थिति सुतराम् इष्ट नाहीं. तर मग मर्दुमकीच्या गुणांचा विकास आमच्या ठायीं व्हावा कसा? असा कोणीं प्रश्न केल्यास त्यास उत्तर असें आहे कीं, ह्या गुणांचें अंगीं वर्धन करणारे युद्धाशिवाय दुसरे कांहीं शांततेचे व्यवसाय आहेत. त्यांत

**नौकानयन**कलेची प्रधानत्वेंकरून गणना करण्यास हरकत नाहीं. तेव्हा आमच्या अंगचे गुण वाढविणारा हा जो व्यवसाय आहे त्यास आह्मी अगदीं अपरिचित राहिल्यास ते गुण आमच्या ठायीं वाढावे कसे? एकाद्या माणसास पोहतां येत नसून त्यास पाण्यांत उतरण्याची संधि किंवा सोय कधींच नसली, तर त्यास पोहतां येत नाहीं ह्मणून दोष लावणें कितपत शाहाणपणाचें होईल बरें? अशीच बहुतेक स्थिति आमची या कलेच्या संबंधानें आहे. तींत आमचे लोक चांगल्या रीतीनें वहिवाटल्यावांचून तिला आवश्यक अशा गुणांचा विकास त्यांचे ठायीं होणें दुरापस्त आहे. दुसरें असें कीं, मनुष्यास जितके उपजीविकेचे मार्ग खुले होतील तितके थोडेच आहेत. त्यांतून आमच्या ह्या विपन्न देशांत तर अशा नव्या नव्या मार्गांची आवश्यकता अतिशयित आहे. येथें कोणत्याहि प्रकारचा धंदा काढा, तो चालविण्यास लागणाऱ्या माणसांची दुर्मिळता पडेल असें कदापि घडणें नाहीं. मग तो धंदा कितीका कष्टप्रद किंवा जोखमाचा असेना. प्राणयात्रा चालविण्यासाठीं मनुष्य पाहिजे तें करण्यास प्रवृत्त होतो. प्रसंगविशेषीं अगदीं अनपेक्षित गुणांचा किंवा दोषांचा उद्भव त्यांच्या ठायीं होऊन त्यांच्या हातून अद्भुत पराक्रम किंवा अत्यंत भयंकर व निंद्य कर्में घडतात. हें, ज्यास मनुष्यस्वभावाचा थोडासा तरी परिचय आहे, त्यास सांगितलें पाहिजे असें नाहीं; आणि मनुष्याच्या मनाचे व्यापार इतर नैसर्गिक व्यापारांप्रमाणें सर्वत्र समान नियमांनीं बद्ध असतां त्यांस ही **भरतभूमिच** अपवाद कशी व्हावी हें आह्मांस समजत नाहीं. आमची समजूत तर अशी आहे कीं, कार्यकारण-भावसंबंध सर्वत्र सारखाच असल्यामुळें जेथें कोठें इष्ट कार्यसिद्धि होत असेल, तेथें ती कां होते याचा अगदीं सूक्ष्म रीतीनें व निःपक्षपात बुद्धीनें शोध करून व योग्य कारणांचा निश्चय करून त्याच कारणांचा अभियोग इतरत्र केला असतां, समान फलप्राप्ति होण्यास तत्वदृष्टीनें पाहतां कोणत्याहि

प्रकारची हरकत नसावी. ह्या कारणांपैकीं कांहीं कारणें स्थलकालव्यक्तिभेदेंकरून अप्रयोजक होऊन समान कार्यनिष्पत्ति होत नाहीं. हें जरी खरें आहे, तरी त्यांचा अप्रयोजकपणा स्थापित करावयाचा तो अनुभव घेऊन करावयाचा; केवळ कल्पनेच्या जोरावर कोणताहि निर्णय करणें असमंजसपणाचें होय. यावरून पाहतां **नौकानयनास** आवश्यक अशा गुणांचा विकास आमच्या ठायीं होणें अशक्य आहे, असें विधान अनुभव घेतल्यावांचून करणें धृष्टतेचें द्योतक होय. असो, आतां दुसरें ह्मणणें जें कीं, आमच्या ठायीं त्या गुणांचा अंकुरहि मुळीं नाहीं, त्याचा थोडासा विचार करूं. प्रथमतः हें तर येथवरच्या प्रतिपादनावरून सिद्ध झालें आहे कीं, असें विधान ह्या देशांतल्या सर्वच लोकांच्या संबंधानें कोणी फारकरून करणार नाहीं. आतां हें खरें कीं, **नौकानयनास** आवश्यक असणाऱ्या गुणांपैकीं कांहीं गुणांचा अभाव ज्यांच्या अंगीं आहे असे लोक आमच्या इकडे पुष्कळ आहेत. पण ही स्थिति नाहीं कोणत्या देशाची? जेथें ह्या कलेचा पूर्ण उत्कर्ष झाला आहे त्या देशांतसुद्धां नाहींकां असे लोक सांपडावयाचे? पण हे असे लोक देशांत पुष्कळ असल्यानें बिघडलें काय? सर्वचजण कांहीं दर्यावर्दी होणार नाहींत. दुसरें असें कीं, **नौकानयन**कलेस लागणाऱ्या गुणांपैकीं एक दोन खेरीजकरून बाकीचे सगळे इतर धंद्यांतहि कमीजास्त प्रमाणानें लागत असून ते प्रयत्नसाध्य आहेत. तेव्हां त्यांची आवश्यकता भासतांच तत्प्राप्तीच्या प्रयत्नास लागल्यानें मनुष्यांच्या अंगीं ते येणार नाहींत अशी कोठें गोष्ट आहे? अभ्यास आणि नित्याचा सराव यांस ते सर्वदा सुगम आहेत. आतां शौर्य, साहस इत्यादि जे गुण जन्मप्राय ह्मणून गणिले आहेत तेहि मनुष्यास अल्पप्रमाणानें कष्टसाध्य आहेत. पण येथें ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, शौर्यसाहसादि गुण **ईश्वराची** ज्यावर कृपा होईल त्यासच

प्राप्त होतील अशी जी कित्येकांची समजूत आहे, ती आधुनिक शास्त्रज्ञांनीं बिलकूल चुकीची आहे असें सप्रमाण सिद्ध केलें आहे. मनुष्येतर प्राण्यांच्या ठायींची उपजत बुद्धि, **कालिदास, शेक्स्पीअर** इत्यादिकांचें कवित्व, **व्यास, न्यूटन, बेकन** इत्यादिकांचें तत्वज्ञान, **शिवाजी, वाशिंगटन** इत्यादिकांचें शौर्य, हीं मनुष्याच्या स्वाधीनचीं नाहींत असें पुष्कळ अतज्ज्ञ लोक मानतात. वास्तविक पाहतां ह्या गुणांचा उद्भव व विकास हे नैसर्गिक कारणांवरच अवलंबून आहेत. तेव्हां ह्या कारणांचा निश्चय झाला कीं, अभिष्ट कार्यसिद्धीस प्रत्यवाय बिलकुल उरणार नाहीं. **लॉक, बेन, स्पेन्सर** आदिकरून आधुनिक पाश्चात्य मानसशास्त्रप्रणेत्यांनीं जे कांहीं मानवी मनोव्यापारांच्या संबंधाचे नियम स्थापित केले आहेत, त्यांवरून पाहतां, ज्या गुणांला लोक ईश्वरदत्त अतएव अकारण ह्मणतात, ते गुण एक तर पितृपुत्रपरंपरेनें आलेले असतात, किंवा ज्या व्यक्तींच्या ठायीं त्यांचा आविर्भाव होतो त्यांच्या गर्भधारणेपासून तों तहत चांगलें पोक्त वय होईपर्यंत ते गुण अंकुरित होऊन वृद्धि पावण्यास अनुकूल अशा स्थितिविशेषांत ते केवळ यदृच्छेनें येतात. पितरांपासून संततीस शरीरधर्माप्रमाणें मानसिक धर्महि प्राप्त होतात ह्मणून वर सांगितलें, त्यावर कित्येक अशी शंका घेतील कीं, पितरांस तरी ते गुण कसे प्राप्त झाले? या शंकेचें समाधान वरील दुसऱ्या नियमांतच आहे. सारांश काय कीं, व्यक्तीव्यक्तींमध्यें किंबहुना राष्ट्राराष्ट्रांमध्यें जो विलक्षण भिन्नभाव दृष्टोत्पत्तीस येतो त्याची मीमांसा अन्य कोणत्याहि प्रकारें न करितां, केवळ नैसर्गिक स्थितिविशेष व अबाधित कारणपरंपरा यांचा तो परिणाम आहे असें सप्रमाण सिद्ध झाल्यानें मनुष्य स्वोन्नतीविषयीं उदास किंवा हताश होणार नाहीं. सर्व कांहीं आपल्या कर्तबगारीवर अवलंबून आहे, असें त्यास वाटल्यानें त्याच्या ठायीं उत्साह व उमेद यांचा प्रादुर्भाव होऊन

त्याच्या हातून पुष्कळ चांगल्या गोष्टी होण्याचा संभव आहे; आणि सर्वशास्त्रज्ञसंमत जो पितृपुत्रपरंपरेचा नियम त्याअन्वयें कष्टप्राप्त जो गुणसमुच्चय त्याचा कांहीं अंश आपल्या संततीस देण्यास मनुष्य समर्थ होतो. पुढें त्याच्या संततीनें अशा प्रकारें पूर्वजप्राप्त गुणांची जोगवण व उन्नति करणाऱ्या व्यवसायाचें अवलंबन केलें असतां कालेंकरून त्याच्या वंशांत त्या गुणांचें कायमचें अधिष्ठान होतें. यावरून पाहतां जे कोणी आज आपल्या ठायींच्या विशेष गुणांविषयीं शेखी मिरवीत असून ते दुसऱ्यास प्राप्त व्हावयाचे नाहींत असें मोठ्या दिमाखानें ह्मणत असतील, त्यांचें तें ह्मणणें वायफळ आहे. तेव्हां ह्या एकंदर उहापोहाचें पर्यवसान काय कीं, आमच्या लोकांनीं परकीयांनीं दिलेल्या दूषणांस बिलकूल न जुमानतां **नौकानयनास** आवश्यक अशा गुणांचा संग्रह आपल्या ठायीं करण्याविषयीं सतत झटल्यास त्यांचे प्रयत्न सफळ झाल्यावांचून राहणार नाहींत; आणि आह्मांपैकीं ज्या कित्येकांस परकीयांच्या अशा उत्साहभंजक दोषोक्तींचा अनुवाद करण्याची दुष्ट संवय लागून गेली आहे त्यांनीं तिचा त्याग करावा. अशा लोकांनीं हें नीट ध्यानांत बाळगावें कीं, ही कला वहिवाटण्यास लागणारा थोडाबहुत मगदूर आमच्या लोकांपैकीं कित्येकांच्या ठायीं आज मित्तीला आहे, हें प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध आहे. दुसरें असें कीं, त्यांस योग्य प्रोत्साहन व संधि मिळून शिक्षणादिकेंकरून त्यांच्या शरीरावर व मनावर इष्ट प्रकारचे संस्कार झाल्यानें ते ह्मणजे अगदींच नालायक राहतील असें मुळींच ह्मणतां येणार नाहीं.

येथवर फक्त आमच्या मानसिक योग्यतेचा विचार झाला. आतां आमची शारीरिक स्थिति ह्या कलेस कितपत अनुकूल आहे तें पाहूं. वरील विवेचनाचा जो कोणी बारकाईनें विचार करील, त्यास मुळीं ह्या

गोष्टीचा येथें स्वतंत्र निर्देश निरर्थक वाटेल. परंतु आमच्या शारीरिक दुर्बलतेचा पुकारा जिकडे तिकडे होत असून ज्या त्या गोष्टीमध्यें पाश्चात्यांहून आमचें हीनत्व स्थापित करितांना हा मुद्दा विशेषेंकरून पुढें येत असतो. ह्मणून त्याचा थोडासा विचार करणें येथें इष्ट दिसतें. "पाश्चात्त्यांच्या जहाजांवरील युरोपीय खलाशी साधारणतः फार बळकट व टणकर असतात. त्यांच्यांतला एखादा खलाशी पिसाळून आमच्यासारख्या दहापांचांच्या अंगावर धांवून येऊन तितक्यांचीहि खबर घेईल. तेव्हां अशा मजबूत लोकांनीं चालविलेलीं कामें आमच्या जरत्कारू लोकांनीं काय होत?" इत्यादि अवसान खचविणारे उद्गार पुष्कळांच्या तोंडून निघतात. त्यांस असें उत्तर आहे कीं, आमचे लोक लहानपणापासून त्या धंद्यांत पडून त्यांस योग्य प्रकारचें खुराक वगैरे मिळाल्यानें त्यांच्याहि स्नायूंची तशीच उन्नति होण्यास कांहीं एक हरकत नाहीं. पण नुसतें शारीरिक बलच तेवढें पुरत नसतें. बहुतेक धंद्यांमध्यें व त्यांतून विशेषतः **नौकानयना**मध्यें सहनशक्तीची जरूर विशेष लागते. ही सहनशक्ति मांसाहारी लोकांत बरीच कमी असते. आमचे पुष्कळ लोक जरी मांस खाणारे आहेत, तरी तें ते फार अल्पप्रमाणानें व क्वचित् कधीं तोंडीं लावण्यासारखें खात असल्यामुळें त्यांस मांसाहारी ह्मणतां येत नाहीं. यास्तव आमच्या लोकांत सहनशक्ति सामान्यत्वेंकरून विशेष असते. उदाहरणार्थ पशु पहा. जे पशु मांसभक्षक असतात ते जरी बरेच बळकट व जोमदार असतात, तरी त्यांच्याकडून कोणताहि शारीरिक व्यापार एकसारखा फार वेळपर्यंत होत नाहीं; ते लवकर थकतात. तेंच घोडा बैल वगैरे जनावरांचें पहा. ह्या पशूंत मांसाहार बिलकूल चालत नाहीं. त्यांना तुह्मी हवें तसें हवा तितका वेळ राबवा. तें लवकर थकत नाहींत. त्यांची सहनशक्ति जबरदस्त असते. हाच नियम मनुष्यांसहि लावण्यास हरकत नाहीं.

दुसऱ्या एक दोन गोष्टी ह्या भक्ष्यपदार्थांच्या भिन्नत्वास लागून आहेत, त्या येथें सांगतों. वनस्पत्याहारी जन कमीजास्त वेळपर्यंत मांसाहारी झाल्यास फारसें कांहीं नुकसान होत नाहीं, पण मांस खाण्याचें टाकून दिल्यानें मांसभक्षक लोक कांहीं दिवस तरी अगदीं ग्लान व मलूल होतात; आणि सामान्य नियम असा आहे कीं, मांसाहार वनस्पत्याहारापेक्षां पुष्कळ खर्चाचा असून तो उत्तरोत्तर अधिकाधिक महाग होत चालला आहे. तेव्हां त्याचा दुर्मिळपणा विशेष संभवनीय आहे हें उघड आहे. असें आहे तर पैशाची टंचाई असली ह्मणजे तो मिळणें कठीण जाऊन पुष्कळ तोटा होण्याचा संभव आहे. दुसरा असा एक नियम अवलोकनांतीं स्थापित झाला आहे कीं, मांसाहारी लोकांस रोगाची जितकी भीति असते तितकी वनस्पत्याहारी जनांस नसते. आणखी असें कीं, मांसाहार व मद्यपान यांचा अन्योन्य संबंध फारच निकट आहे असें दिसतें. कारण जितके मांस खाणारे तितके बहुतकरून मद्यपी असतात; आणि मद्यपान आरंभीं अगदीं माफक असतें, तरी तें शारीरिक श्रम करणाऱ्याच्या ठायीं वाढून त्याचें लवकरच कसें सर्व प्रकारें मातेरें करितें, हें सर्व विचारी पुरुषांस ठाऊकच आहे. यावरून ह्मणजे कोणी असें समजूं नये कीं, आमच्या लोकांत मद्यपान कमी आहे. पण ही गोष्ट सर्वजण कबूल करतील कीं, **युरोपीयां**-इतकी मद्यप्रीति आमच्याइकडे अजून वाढलेली नाहीं; आणि ह्याचें एक सबळ, कारण आमच्या लोकांच्या खाण्यांत मांस फारच थोडें येतें, हें होय असें वाटतें. आणखी एक गोष्ट या अन्नाच्या भिन्नत्वाच्या संबंधानें अशी सांगावयाची कीं, मांसाहारी लोक साधारणतः आवेशी असल्या कारणानें त्यांस कह्यांत ठेवणें बरेंच मुष्किलीचें काम असतें. तेंच वनस्पत्याहारी लोकांचें पहा. ते बहुशः गरीब, साळसूद व आज्ञाधारक असतात. एवढ्या गोष्टी लक्षांत आणिल्या असतां कोणाचीहि खात्री

होईल कीं, आमचे लोक शारीरिक बाबतींतहि त्यांच्याहून कोणत्याहि प्रकारें कमी नसून उलटे पुष्कळ प्रकारें श्रेष्ठ आहेत.

आणखी एक शंका कित्येकांच्या मनांत अशी येण्यासारखी आहे कीं, निरनिराळ्या हवेमध्यें आमच्या लोकांचा निभाव लागणें नाहीं. ही शंका अगदीं निराधार आहे, व अनुभव याच्या उलट आहे. आह्मां उष्णकटिबंधांतील लोकांस कोणत्याहि कटिबंधांतील हवापाणी मानण्यासारखें आहे; मात्र अन्नवस्त्रादिकांमध्यें योग्य पालट केला पाहिजे. इतकेंच नव्हे, तर समशीतोष्ण व शीत कटिबंधांमध्यें आमचे लोक विशेष उत्साहानें व जोमानें काम करितात. वास्तविक पाहतां शारीरिक किंवा मानसिक उद्योगक्षमतेचें मान कमी व्हावयाचें कायतें उष्ण कटिबंधात. परंतु आमचे लोक मूळचे येथलेच रहिवासी असल्यामुळें त्यांच्यावर उष्ण हवेचा हा अनिष्ट परिणाम फारसा होत नाहीं; आणि समशीतोष्ण कटिबंधांतील लोकांस उष्ण प्रदेशांत अंग मेहनतीचीं कामें चांगलींशीं करितां येत नाहींत, हें सर्वजनविश्रुतच आहे. तेव्हां इकडूनहि पाहतां आमचे लोक ही कला कोणत्याहि हवेंत वहिवाटण्यास मुळींच नालायक नाहींत असेंच ठरतें.

येथवर आह्मीं जें प्रतिपादन केलें, त्यावरून आह्मांस **नौकानयन** कलेची आवश्यकता असून ती वहिवाटण्यापुरता मगदूर आज आमच्यापैकीं कांहीं जणांच्या अंगीं आहे, व तो अभ्यासादिकांच्या योग्य तजविजी झाल्यास पुढें पुष्कळांच्या ठायीं उत्पन्न होऊन वाढण्याचाहि दृढ संभव आहे. आतां ह्या कलेचा प्रसार आमच्या इकडे होण्यासाठीं कोणीं कोणीं काय काय केलें पाहिजे तें संक्षेपानें सांगून हा बराच लांबलेला लेख पुरा करूं.

( १ ). पहिला उपाय ह्मटला ह्मणजे अर्थात् हा कीं, आमच्या सुशिक्षित मंडळीनें या कलेचा अभ्यास करावा. आजपर्यंत केवळ अशिक्षित

लोकच ह्या धंद्यांत पडल्यामुळें त्यांत त्यांची फारशी गति झाली नाहीं. कोणताहि साधारण **इंग्रजी ग्रंथ** समजण्यापुरतें त्या भाषेचें ज्ञान असून गणितादि शास्त्रांचें बरेंच ज्ञान पैदा केलेले तरुण पुरुष जर **इंग्रजांनीं** चालविलेल्या जहाजांवर काम शिकण्यासाठीं किंवा नोकरी धरून कांहीं कालपर्यंत राहतील तर त्यांचा ह्या धंद्यांत सहज प्रवेश होईल. ही अशी नोकरी धरण्यापूर्वी त्यांनीं **मुंबईतील टेक्निकल इन्स्टिटयूट्** किंवा **परळावरील** रेलवेवर्कशॉपुसारख्या ठिकाणीं कांहीं दिवस राहून यांत्रिक कलेची वगैरे थोडीशी माहिती मिळविलेली असावी. इतक्या तयारीनिशीं **इंग्रजलोकांच्या** एकाद्या तारवावर चार पांच वर्षें राहून **नौकानयनांतर्गत** निरनिराळ्या विषयांचें अध्ययन सप्रयोग केलें असतां, **ग्रेटब्रिटनांत** निरनिराळ्या ठिकाणीं होणाऱ्या ह्या धंद्यासंबंधाच्या परीक्षांस बसण्याची योग्यता व अधिकार, पाहिजे त्या देशांतल्या मनुष्यास येतो. ह्या परीक्षा निरनिराळ्या कामांसंबंधीं असतात. ह्या परीक्षा उतरल्यावांचून कोणासाहि तीं तीं कामें कायमचीं मिळण्याजोगीं नसतात. अगदीं पाहिली परीक्षा जी आहे, तीस बसण्याची योग्यता येण्यासाठीं उमेदवारास निदान चार वर्षें जाहजावर काढावीं लागतात. इतक्या अवकाशांत त्यास कांहीं विवक्षित कामांची माहिती झालेली असून तीं नटिपणें वहिवाटल्याचा दाखला त्याला त्याच्या वरील अंमलदाकडून मिळवावा लागतो. बाकी जे विषय पुस्तकांच्या द्वारें शिकावयाचे असतात तेहि नेमिलेले असतात. ह्या परिक्षेस सतरा किंवा सतराहून जास्त वयाच्या उमेदवार चालतो. आतां ह्या परीक्षांत अगदीं पहिल्या प्रतीची परिक्षा ह्मटली ह्मणजे तारवावरच्या मुख्य अंमलदाराची (मास्टरची) होय. ह्या परीक्षेस बसणारा उमेदवार १९ वर्षांचा किंवा १९ हून जास्त वर्षांचा असून तो निदान सहा वर्षें तरी जहाजावर काम केलेला असावा, असें आहे. यावरून पाहतां आमच्या लोकांस योग्य संधि व सोई मिळाल्यास

व त्यांनीं मनावर घेतल्यास ह्या परीक्षा त्यांस देण्यास फारसें कठीण जाईल असें नाहीं. आमच्या तरुण होतकरू मंडळीस लहानपणापासून शाळेंतील विद्याभ्यासाबरोबर उपयुक्त हस्तश्रमाची थोडथोडी संवय होण्याची सोय झाल्यानें असल्या धंद्यांत पडण्यास त्यांना फारसें जड जाणार नाहीं व दिक्कतहि वाटणार नाहीं. आतां येथें अशी एक शंका आहे कीं, जहाजें फुटण्याची वगैरे भीति असल्यामुळें आपल्या मुलांस ह्या जोखमाच्या धंद्यांत घालण्यास लोक तयार होणार नाहींत. ह्या शंकेचें समाधान असें आहे कीं, ही भीति पहिल्या-पहिल्यानें बरीच वाटण्यासारखी आहे खरी, पण एकदा कांहीं लोकांनीं धैर्य केलें असतां पुढें त्याची फारशी भीति उरणार नाहीं. लष्करांत नोकरी धरण्यास जशी कधीं कोणाला भीति वाटत नाहीं, तशीच गोष्ट ह्या धंद्याची होईल. किंबहुना हा धंदा लष्करांतल्या नोकरीपेक्षांहि कमी धास्तीचा वाटणार आहे. कारण अलीकडे **नौकानयनास** पुष्कळ सुरक्षितपणा आलेला असून पुढेंहि तो अनुभव व ज्ञान ह्यांच्या वृद्धीनें उत्तरोत्तर वाढतच जाणार आहे. पाश्चात्त्यराष्ट्रांतले लोक आपल्या लहान लहान मुलांना देखील तारवांवर नोकरीस ठेवितात. त्यांना आपलीं मुलें नको असतात काय? तर मग आमच्या लोकांनींच तेवढें वेडें पुत्रवात्सल्य दाखविण्यांत काय अर्थ आहे? मागें **विलायतेंत** कोणी एकानें कांहीं विवक्षित वर्षांच्या अवकाशांत आगगाड्या व जहाजें यांमुळें झालेल्या मनुष्यहानीची तुलना करून असें ठरविलें होतें कीं, जहाजांपेक्षां आगगाड्यांमुळें झालेले अपघात पुष्कळ होते. हा त्याचा अंदाज खरा असल्यास आगगाड्यांपेक्षां तारवांवर भीति थोडी 'असें सिद्ध होतें. तेव्हां आमच्या लोकांनीं ह्या व्यर्थ भीतीचा त्याग करून ह्या धंद्याचें बेलाशक अवलंबन करावें. यांतच खरी मर्दुमकी आहे.

(२). दुसरा उपाय असा सुचवावयाचा कीं, जे कित्येक लोक आज ह्या धंद्यांत पडले आहेत, त्यांच्या मुलांस योग्य तऱ्हेचें शिक्षण मिळेसें करावें, ह्मणजे ते आपल्या वडिलांच्या धंद्यांत पडण्यास फारसे कचरावयाचे नाहींत. शिवाय ते त्या धंद्यांत लवकर तरबेत होण्याचाहि संभव विशेष आहे. **कोळी, नाखवे, गाबीत** इत्यादि कित्येक जातींमध्यें ह्या धंदा पुष्कळ काळापासून चालत आला असल्या कारणानें त्यांच्यांतल्या तरुण पुरुषांस तो चालविण्यास फारशी लाज किंवा हरकतहि वाटणार नाहीं, आणि जुन्या चालीचे भोळ्या समजुतींचे लोकहि त्यांस नांवें ठेवणार नाहींत. तेव्हां हे लोक आपल्या संततीस ह्या सुधारलेल्या धंद्यास उपयुक्त असें उभय प्रकारचें शिक्षण देण्यास प्रवृत्त होतील, अशी तजवीज झाली पाहिजे. आजला हे लोक बहुतेक अशिक्षित असल्यामुळें त्यांस ह्या सुधारलेल्या तऱ्हेच्या **नौकानयन** कलेचा अभ्यास कसा करावा हें कळण्याचा मार्गच मुळीं नाहीं. ह्मणून ह्या अभ्यासांत आपल्या मुलांस ते आपण होऊन घालतील असें फारकरून होणें नाहीं. पण एकदां त्यांना ह्या अभ्यासाचें महत्व कळून आलें, ह्मणजे मग त्यांचें प्रोत्साहन दुसऱ्यांनीं करण्याचें फारसें प्रयोजन उरणार नाहीं.

(३). आतांपर्यंत जे उपाय सांगितले, ते केवळ **इंग्रज** लोकांच्या जहाजांवरून आमच्या लोकांस बिनहरकत राहतां येईल असें गृहीत धरून सांगितले. पण हें राहतां येणेंच मोठें कठीण आहे. कारण त्यांच्या जहाजांवर केवळ हलक्या प्रतीचीं कामें करण्यासाठींच बहुतेक आमच्या लोकांना ठेवीत असतात. त्यांना चांगलीं चांगलीं कामें सांगून हुशार करण्याचा त्यांचा इरादा नसतो. याकरितां मोठमोठ्या शेट सावकारांनीं, राजे रजवाड्यांनीं व **ब्रिटिश** सरकारानें पाश्चात्य नौकानायकांपाशीं आपलें वजन खर्चून आमच्या लोकांस त्यांच्या जहाजांवर नोक-

रीच्या बढतीची व शिकण्याची सोय होईल असें करावें. दुसरें असें कीं, आमच्या धनाढ्य लोकांनीं आपला कांहीं पैसा ह्या वहनव्यापारांत घालून मोठमोठीं सुधारलेल्या तऱ्हेचीं जहाजें बाळगावीं, व त्यांवर होतां होईतों आमचेच लोक ठेवण्याची तजवीज करावी. येथें आणखी एक मोठ्या महत्वाची गोष्ट अशी लक्षांत ठेविली पाहिजे कीं, हीं सारींच तारवें नेहमीं इंग्लंडांतून बांधून आणून मुळींच निर्वाह लागावयाचा नाहीं. तीं बांधण्याचे कारखाने इकडे जागोजाग काढिले पाहिजेत. ह्या कारखान्यांतील कामें सुद्धां करवतील तितकीं आमच्याच लोकांच्या हातून करविलीं पाहिजेत. यास्तव विलायतेंतील तारवें बांधण्याच्या मोठमोठ्या कारखान्यांत राहून शिकण्यासाठीं पुष्कळ योग्य तरुण पुरुषांस पाठविण्याची सोय झाली पाहिजे. हें पाठविणें ह्मणजे एक मोठीच खर्चाची बाब आहे, तरी आमच्या धनाढ्य लोकांनीं व संस्थानिकांनीं मनावर घेतलें असतां पुष्कळ होण्यासारखें आहे. तूर्त हे कारखाने युरोपांतल्या वाकबगार मनुष्यांच्या साहाय्यानें काढिले तरी चालेल. पुढें आमचे लोक त्यांच्या हाताखालीं शिकून तयार होतील. आज मुंबईसारख्या ठिकाणच्या गोद्यांतून असे युरोपीय लोकांपासून शिकलेले आमचे लोक पुष्कळ आढळतात. पण ह्या गोद्यांतून तारवें बांधण्याचें काम होत नसल्यामुळें त्या कामांत त्यांना गम्य नाहीं; तरीहि त्या कामांत ते वहिवाटल्यास त्यांना ह्मणजे तें कठीण जाईल असें नाहीं. तशांत लहानपणापासून थोडीथोडी हस्तश्रमाची संवय असून आणखी ह्या धंद्यास उपयोगी पडेल असें पुस्तकी ज्ञान सप्रयोग मिळविलेले तरुण पुरुष जर ह्या धंद्यांत मन घालतील, तर त्याचा प्रसार इकडे झपाट्यानें होऊं लागेल, आणि देशांत उद्योग वाढेल.

शेंवटीं आमच्या सर्व देशबांधवांस, शेटसावकारांस, श्रीमंत लोकांस व संस्थानिकांस अशी विनंति आहे कीं, त्यांनीं ह्या कलेकडे इतःपर

बिलकूल दुर्लक्ष करूं नये. ह्या कलेच्या प्रसारास ज्या ज्या अडचणी असतील, त्या त्या नाहींतशा करण्यास त्यांनीं तनमनधनेंकरून झटावें. आमच्या ह्या विपन्न राष्ट्राची उन्नति व्हावयाला पाहिजे असल्यास ह्या अत्यंत उपयुक्त कलेविषयीं आपण बेफिकीर राहून उपयोगीं नाहीं. या कलेस प्रतिकूल असे सर्व प्रकारचे वेडे समज, फाजील धास्ती व आपल्या कर्तबगारीविषयीं निरर्थक आशंका यांस आह्मी आपल्या हृदयांत कदापिहि थारा देऊं नये. ह्या एवढ्या विस्तीर्ण देशाला तिहींकडून पाणी असून व त्याचा परदेशांशीं एवढा मोठा व्यापार चालत असून त्यांतला अगदीं थोडा व्यापार ह्या देशच्या लोकांच्या हातीं असावा, व तोहि केवळ जवळ जवळच्याच मुलुखांपुरता असावा, ही मोठी लज्जास्पद, खेदकारक, व अहितकर गोष्ट होय. आमचे शिकलेले लोक सारेच कारकुनीच्या वगैरे केवळ बायकांना योग्य अशाच नोकऱ्या मिळविण्याच्या नेहमी प्रयत्नांत असतात, हें अगदीं वाईट आहे. बुद्धिमत्ता व शारीरिक कुशलता यांचा ज्या व्यवसायांत उपयोग लागतो, अशा व्यवसायांत मन घालण्याची आमच्या सुशिक्षित लोकांस जोंपर्यंत बुद्धि होणार नाहीं, तोंपर्यंत आमच्या देशाला चांगली दशा प्राप्त होण्याची आशा स्वप्नांतहि करायाला नको. आमच्या भोंवतालचीं बहुतेक राष्ट्रें सर्व प्रकारें झपाझप सुधरत चाललीं असतां आह्मीच तेवढे अगदीं स्वस्थ बसून राहिलों, तर आमची पुढें धडगत दिसत नाहीं. यासाठीं ज्या ज्या उपायांनीं ह्मणून आमचा उत्कर्ष होण्यासारखा असेल, ते ते उपाय योजण्यास आह्मी आळस करितां कामा नये. ह्या **नौकानयन**कलेच्या सुधारणेस राजाश्रय अवश्य पाहिजे, ह्मणून वर एके ठिकाणीं सांगितलें आहे. त्याची प्रतीति अलीकडे **जपान**च्या संबंधानें चांगली आली आहे. ह्या राज्याची सुमारें तीस चाळीस वर्षांपूर्वीं अगदीं सामान्य प्रतीच्या राष्ट्रांत गणना होती. पण एवढ्या

तर कुटुंबाच्या निर्वाहाकरितां मुलास कर्ज काढावें लागतें. हें अपरिहार्य कारणांपैकीं एक कारण होय, व याबद्दल कर्ज करणारास दोष देतां येणार नाहीं. परंतु ज्या गोष्टी त्याच्या स्वाधीनच्या आहेत त्यांबद्दल, त्यानें कर्ज काढिलें असतां, त्यास दोष देणें गैरवाजवी होणार नाहीं. आतां दुसऱ्या प्रकारच्या ह्मणजे परिहार्य कारणाबद्दल विचार करूं.

**( १ ) लग्नकार्य आणि क्रियाकर्म ह्यांच्यावेळीं उधळपट्टीचा खर्च.** एका एतद्देशीय ग्रंथकारानें हिंदुलोकांच्या विगुणक वर्तनासंबंधानें असें लिहिलें आहे कीं:—

"ते स्वभावतः खरोखरी उधळे नाहींत; उलटे कृपण "आणि लोभी आहेत, ह्मणून ह्मटलें तरी चालेल. सांठवून ठेविलेल्या "पैशाचें काय करावयाचें त्याबद्दल त्यांच्या मनांत कल्पनाहि येत "नाहीं, परंतु तो जमेल तितका जमवून त्याच्या थैल्या बांधून ठे-"वाव्या असा त्यांचा पूर्ण हेतु असतो. अशी जरी त्यांची स्वभा-"विक प्रवृत्ति असते, तरी ते एकदा खर्च करूं लागले ह्मणजे त्या "प्रवृत्तीच्या अत्यंत विरुद्ध वागतात. आणि क्षुल्लक बाबतीसाठींहि "अचाट खर्च करितात. एक लग्न उभें राहिलें, ह्मणजे जवळचें "बहुतेक नाहींसें होतें. गरीबगुरिबांचाहि ह्याप्रमाणें खर्च करण्याचा "पाठ असून सावकाराचें कर्ज काढिल्यामुळें शेंकडों कुटुंबांची "दुर्दशा झालेली अढळून येते. ह्यांत नवल तें हेंच कीं, जे एवढे "द्रव्याचे लोभी आणि तें संपादन करण्यासाठीं जी पाहिजे ती नीच "नोकरीहि करितात तेच लोक हें द्रव्य अशा प्रकारें उडवून कसें "टाकितात. !"

मद्रासयेथील मरहूम धर्मोपदेशक स्टिव्हेन्ससाहेब साधारण लग्नासंबंधीं लिहितात कीं:—

" एका गृहस्थास आपल्या मुलीचें लग्न करावयाचें आहे.
" त्याचा दरमहा पगार रुपये पन्नास असून पाठीमागें शिल्लक
" टाकिलेली बिलकुल नाहीं; परंतु त्याच्या योग्यतेच्या लोकांचा दरएक
" लग्नाकरितां पांचशें रुपये खर्च करण्याचा पाठ आहे. हा खर्च
" करण्याकरितां आपल्यास साधनें नाहींत, सबब जबर व्याजानें
" कर्ज काढल्याशिवाय सुटका नाहीं, हें त्यास पक्कें माहीत आहे.
" आपण जें कर्ज करूं ते कित्येक वर्षांत फिटावयाचें नाहीं, त्या-
" खालीं आपला चुराडा होऊन जाईल, अशी त्याची खात्री असते.
" अशा प्रसंगीं तो छाती ठोकून असें कां ह्मणतो ? 'अरे बुवा ! माझ्या-
" जवळ पैसा नाहीं. कर्जाचा बोजा माथ्यावर घेणें, हें केवळ
" गैरशिस्त आणि मूर्खपणाचें काम आहे. मी आपल्या ऐपतीप्रमाणेंच
" खर्च करीन, मग कांहीं होवो.' छे !! तो खालीं मान घालून
" ह्मणतो, 'काय करूं रे बाबा ! वाडवडिलांपासून हा रिवाज
" चालत आला आहे. हा खर्च मीं न केला, तर भाऊबंद आणि
" शेजारीपाजारी मला हिणवितील; मला तोंड काढूं देणार नाहींत.'
" असें ह्मणून जनापवादाचा प्रतिकार न करितां त्यास भिऊन तो
" मूर्खपणानें कर्जाच्या असह्य जुवाखालीं आपली मान गुंतवून घेतो."

**पंजाबांत** आणि **गुजराथेंत** प्रत्येक ह्मातान्या मनुष्याच्या क्रिया-कर्माकरितां सरासरी ९०० रुपयांपर्यंत खर्च करितात, असा अदमास आहे. **पंजाबांत** मुलीच्या बापास मुलाच्या बापानें सरासरी ४०० रुपये दिल्याशिवाय लग्न होत नाहीं. **महाराष्ट्रांत** हल्लीं हुंड्या-साठीं किती मोठी रक्कम द्यावी लागते, ती सर्वांस माहीतच आहे. शास्त्रा-प्रमाणें हुंडा ही वर दक्षिणा आहे आणि ती कन्यादानाचे वेळीं देण्याची आहे. परंतु हल्लीं हुंड्याची रक्कम पदरांत पडल्याशिवाय लग्न-समारंभास सुरुवातच करित नाहींत. **दक्षिणेंत** ह्या हुंड्यासंबंधानें घडून

येणाऱ्या परिणामांवरून सरकारानें अद्यापि लग्नकार्यांच्या बाबतींत हात घातला नाहीं; परंतु **गुजराथेंत** पाटीदार, कडवेकणबी वगैरे लोकांच्या ह्या कार्यासंबंधी होणाऱ्या खर्चाच्या बाबतींत सरकारानें कानून करून नियमन करून टाकिलें आहे. मुलीच्या लग्नांत लागणारा हानिकारक खर्च टाळण्याकरितां **रजपूत** लोक आपल्या लहान मुलींचा घात करीत, आणि त्यांस 'दूधपित्या' केल्या ह्मणून ह्मणत.* त्याचा बंदोबस्त करण्याकरितां **इंग्रज** सरकारास कित्येक वर्षेंपर्यंत मुद्दाम निराळे लोकांची नेमणूक करावी लागली होती.

हिंदुलोकांच्या समाईक कुटुंबपद्धतीमुळें दरएक कुटुंबांत हमेशा कोणाचें तरी लग्नकार्य किंवा क्रियाकर्म करावयाचें असतेंच. आणि प्रत्येक प्रसंगीं जो खर्च करावयाचा तो, त्या मनुष्याचा एकंदर मिळकतींत जो हिस्सा असतो, त्या हिशावर अवलंबून नसतो. म्हणजे तो मनुष्य विभक्त असतां त्याच्या ऐपतीप्रमाणें जो खर्च झाला असता, त्याप्रमाणें खर्च न करितां त्यास, समाईक कुटुंबाच्या एकंदर दौलतीस व इतमामास शोभेल, असा खर्च करावा लागतो.

ज्यांची या वाईट रीतीभातींबद्दल खातरी झालेली असते असे विद्वान् लोकहि ह्याचें उल्लंघन करूं शकत नाहींत. एक प्रोफेसर हुद्याचे गृहस्थ लिहितात कीं:—

" लग्नकार्यांत सधन सोयरेधायऱ्यांस अहेरसुहेर देण्याकरितां,
" धष्टपुष्ट मंडळीस यथेच्छ मिष्टान्नदानाकरितां, नाचणाऱ्या

---

*. लहान मुलींचा गळा दाबून किंवा इतर रीतीनें घात करण्यास त्यांच्या आईबापांस कठीण वाटे, म्हणून एका मोठ्या गंगाळांत पाणी घेऊन त्यांत अच्छेर पावशेर दूध ओतून तें पांढरें करीत, आणि त्यांत (दूध पिण्याकरितां) मुलींस सोडून देत. ह्याप्रमाणें मुलींचा प्राण घेऊन त्यांस दूधपित्या केल्या म्हणून म्हणत.

" आणि गाणाऱ्या कलावंतिणींकरितां, वरघोडे आणि दारूकामा-
" करितां, आणि लग्नकार्यांत ज्या दुसऱ्या जरूर गोष्टी केल्या
" पाहिजेत ह्मणून समजूत आहे त्या करण्याकरितां, हजारों रुपये
" खर्च करणें ह्मणजे पैशाची निरर्थक उधळपट्टी करणें होय,
" असें मला वाटतें. परंतु त्याचा उपयोग काय? ज्याप्रमाणें इतर
" वागतात त्याप्रमाणें मला वागलें पाहिजे; नाहीं तर, मला कृपण
" ह्मणून सर्व हिणवतील, आणि माझे खरे मित्रहि मीं स्वधर्माचा
" त्याग केला आहे किंवा काय म्हणून संशय घेतील."

ह्याप्रमाणें ज्या राष्ट्रांतील मोठे विद्वान् ह्मणविणारेहि अडाणी लोकांच्या समजुतीबाहेर जाऊं शकत नाहींत, आणि जी गोष्ट वाईट ह्मणून त्यांची खातरी झालेली असते ती केल्याशिवाय राहत नाहींत, त्या राष्ट्राचा ऊर्जित काळ कसा व केव्हां होणार? एका इंग्रजी मासिक पुस्तकाच्या पहिल्या पानावर कवितार्ध दिला आहे, त्याचा तर्जुमा असा करितां येईल कीं:—

**प्रतिकूल असोत सर्वजन । तरी खरें असेल तेंच करीन ।**
**ऐसें जे न ह्मणती आत्माधीन । ते केवळ गर्भदास ॥** *

सारांश, ज्या वेळीं "सबकी सुनना और दिलकी करना" म्हणजे सर्वांचें ऐकून घेऊन जें योग्य वाटेल तेंच करावें, असें वागण्याबद्दल आमच्या लोकांच्या अंगीं नीतिधैर्य येईल, तेव्हांच आमची सुधारणा झाली तर होईल. '**मनःपूतं समाचरेत्**' ह्मणजे मनानें चांगलें घेतलें तें करावें, अशी आमचीहि पुरातन ह्मण आहे. असो.

---

* They are slaves who dare not be,
In the right with two or thre.

धान्य उत्पन्न करण्याकरितां थोडें बीं पाहिजे, त्याचप्रमाणें पैशाचीहि कांहींशी गोष्ट आहे. पैसा संपादन करावयाचा असल्यास प्रथम थोडें भांडवल जवळ पाहिजे, ह्मणजे हा हेतु लौकर शेंवटास जातो. आईबाप मुलाच्या लग्नाकरितां जे हजारों रुपये उडवून टाकितात, तेच त्याच्या उपयोगीं येतील अशा रीतीनें कांहीं व्यापारधंद्यांत घालतील, तर त्यांचा त्यास आणि त्याच्या बायकोस पुढें केवढा उपयोग होईल? ह्यावरून लग्नकार्यांत खर्च केलेला पैसा केवळ उडवून टाकिला जातो इतकेंच नाहीं, तर पुढें त्यापासून होणारा फायदाहि नाहींसा होतो असें दिसून येईल.

लग्नकार्यांत सुखसोहळे करणें कोणीहि गैरवाजवी ह्मणणार नाहीं. आपल्या ऐपतीप्रमाणें स्नेहीसंबंधी यांचें आदरातिथ्य करणें हें भूषणार्ह आहे. परंतु ज्या खर्चापासून आपली सर्वस्वीं हानि होते, असा खर्च करण्याचा पाठ निदान विद्वान लोकांनीं तरी सोडून दिलाच पाहिजे.

**२ डागडागिन्यांत पैसा घालणें.** हिंदुस्थानांत इंग्रज सरकारचें राज्य होण्यापूर्वीं जिंदगीस मोठी जोखीम असे. गिझनीचा महमूद यानें हिंदुस्थानावर बारा स्वाऱ्या करून अपार लूट नेली, ही गोष्ट सर्वांस माहीतच आहे. पेंढारी लोक लुटालूट करून घरादाराचा विध्वंस करीत, त्याचें स्मरण अद्यापि कित्येकांस असेलच. पूर्वीं दरोडेखोरांच्या टोळ्या हातांत पाजळलेल्या मशाली आणि लखलखीत भाले घेऊन पाहिजे त्या श्रीमंताच्या घरास रात्रीं गराडा घालीत. सर्व मालमत्ता त्यांच्या एकदम स्वाधीन न केली, तर ते शरिरास असह्य यातना देऊन हवा तसा छळ करीत. ह्यामुळें त्या वेळीं डागडागिना करून तो, दडवून नाहीं तर, पूरून ठेवावा लागे; व ह्याचमुळें आपल्या देशांत डागडागिन्यांत पैसा घालण्याचा रिवाज जास्ती सुरू झाला असावा. परंतु आतां चोहोंकडे स्वस्थता झाली आहे, तरी तोच रिवाज आज तारिखेपर्यंत जशाचा तसाच चालू आहे!!

हिंदुस्थानास परदेशीय लोक ' सुवर्णादि मौल्यवान् धातूंचें समाधि-स्थान ' ह्मणतात तें यथार्थ आहे. सर्व पृथ्वीवर दरवर्षी निघ-णाऱ्या सोन्यापैकीं एक चतुर्थांश सोनें, आणि चांदीपैकीं एक तृतीयांश चांदी, हिंदुस्थानांत गडप होतात. सन १८०१ पासून आजपर्यंत ४ अब्ज आणि ९० कोटि रुपयांचें सोनें आणि चांदी हिंदुस्थानांत आली. सन १८९०-९१ सालअखेर संपणाऱ्या ५ वर्षांत खालीं लिहिल्याप्रमाणें मुंबईबंदरांतून सोनें आलें व गेलें.

| साल. | आयात. | निर्गत. |
| --- | --- | --- |
| १८८६-८७ | २४६ लाख. | ४९ लाख. |
| १८८७-८८ | २८६ ,, | ११ ,, |
| १८८८-८९ | २७९ ,, | २८ ,, |
| १८८९-९० | ४५२ ,, | ४४ ,, |
| १८९०-९१ | ५३० ,, | ७१ ,, |
| | १७९३ लाख. | २०३ लाख. |

ह्यावरून दिसून येईल कीं, वर दाखविलेल्या ५ सालांत मुंबई-बंदरांतून १७ कोटि ९३ लक्ष रुपयांचें सोनें आलें, व २० कोटि ३ लक्ष रुपयांचें सोनें गेलें; ह्मणजे ह्या ५ वर्षांत फक्त ह्या बंदरांत आलेल्या सोन्यापैकीं १५ कोटि ९० लक्ष रुपयांचें सोनें हिंदुस्थानांत गडप झालें. परंतु सोन्याचें नाणें झालेलें कोठें आढ-ळून येत नाहीं, तेव्हां ह्या सोन्याचे डागिने झाले हें उघडच आहे. चांदी जी आली तिचें बहुतकरून नाणें पाडिलें आहे. त्यापैकीं कांहीं रुपये व्यवहारांत फिरत आहेत, व कांहीं लोकांनीं पुरून ठेविले आहेत. बाकीच्या चांदीचे डागिने करण्यांत आलेले आहेत, असें पुढील तपशि-

त्यावरून ध्यानीं येईल. सन १८४२--४३ सालापासून सन १८९१--९२ सालापर्यंत ३,२४,१९,७८,३९० रुपयांची चांदी **हिंदुस्थानांत** आली. तिच्यापैकीं ह्या ५० वर्षांत २,९९,०००००० रुपयांचें टंकसाळींत नाणें पाडिलें. बाकी २५,१९,७८,३९० रुपयांच्या चांदीपैकीं कांहीं रुपये एतद्देशीय संस्थानांतील टंकसाळींत पाडिले असतील; तरी पण बऱ्याच चांदीचे डागिने करण्यांत आले असावेत, असें कबूल करावें लागेल.

ह्याप्रमाणें सोन्याचांदीचे डागिने केल्यानें आणि नाणें पुरून ठेविल्यानें दरवर्षीं ह्या देशाचें किती नुकसान होत आहे, ह्याची कल्पना सुद्धां आपल्या लोकांच्या मनांत येत नाहीं. ह्यापासून आपलें अनेक तऱ्हेनें नुकसान होत आहे, तें पुढें थोडक्यांत दाखविलें आहे.

प्रथमतः डागडागिने घडविण्यास जी मजुरी लागते, तिजमुळें नुकसान होतें. गेल्या खानेसुमारीप्रमाणें ह्या देशांत सोनाराचा धंदा करणारे एकंदर ४,०१,५८२, आणि लोहाराचा धंदा करणारे ३,८४,९०८ लोक आहेत असें दिसून येतें. दरएक सोनाराची सरासरी दरमहा रुपये ६ प्राप्ति आहे असें घेऊन चाललें, तर दरसाल डागिन्यांच्या घडाईबद्दल २ कोटि ८९ लक्ष रुपये खर्च होतात असें कळून येईल.

ह्या अलंकारपरिधानाच्या पोरकट आणि विपरीत अभिरुचीस वेडें होऊन इतक्या सोनारांचा उपयोग करण्यापेक्षां, त्या सर्वांस लोहारांचें काम करावयास लावून नांगर आणि दुसरीं शेतीचीं आउतें सुधारावयास लाविल्यास किती बरें फायदा होईल !!

आपल्या देशांत हल्लीं भांडवलाची किती जरूर आहे, ती सर्वांस माहीतच आहे. तें भांडवल नाहींसें करण्याकरितां हा दरवर्षीं २ कोटि

आणि ८९ लक्ष रुपयांचा खर्च करण्यांत येतो. ह्याशिवाय दुसरें नुकसान होतें तें पहा ! पैसा व्याजीं लावितां येतो, त्याप्रमाणें डागडागिने लावितां येत नाहींत. व्याजबट्टा करणारांस दरसाल ६ पासून ३६ टक्के व्याज मिळतें; तें व्याज डागडागिने करणारांस न मिळाल्यानें त्यांचें इतक्या रकमेचें नुकसान होतें.

कैलासवासी श्रीमंत **जयाजीराव शिंदे** यांनीं **गंगाजळीं**त ३ कोटि ५० लक्ष रुपये ठेविले होते. ह्या रुपयांपासून उत्पन्न कशाचें ? त्यांवर कीट मात्र चढत होता. हल्लीं **ग्वाल्हेरीस** नेमिलेल्या **रीजन्सीनें** ते **इंग्रज** सरकारास रेल्वे बांधण्याकरितां व्याजीं दिले आहेत; त्यांचें दरवर्षी १४ लक्ष रुपये व्याज येतें. **रीजन्सीनें इंग्रज** सरकारास रुपये दिले हें बरें केलें नाहीं, असें ह्मणणारे पुष्कळ लोक आहेत. आमचें ह्मणणें त्यासंबंधानें कांहीं नाहीं. दुसऱ्या रीतीनें जरी ही रक्कम कामीं लाविली असती, तरी हरकत नव्हती; परंतु पुरून ठेविण्यांत कांहीं अर्थ नाहीं, इतकेंच सांगण्याचा आमचा हेतु आहे.

**हिंदुस्थानां**त डागडागिन्यांत गुंतलेले किंवा लोकांनीं पुरून ठेविलेले असे निदान २ अब्ज रुपये असतील, असा अदमास आहे. ह्या रकमेचें कमींत कमी ६ टक्क्यांचें व्याज गणिलें असतां दरवर्षी १२ कोटि रुपये होतात. ह्मणजे **हिंदुस्थान**च्या एकंदर ऐनकाळीच्या ( जमीनबाबीच्या ) उत्पन्नाच्या निम्म्या रकमेइतकी ही रक्कम होते. तेंच १२ टक्क्यांचें व्याज गणिलें तर २४ कोटि रुपये होतात, ह्मणजे एकंदर ऐनकाळीच्या रकमेइतकी रक्कम होते. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, सर्व डागडागिने मोडून जो पैसा उत्पन्न होईल, तो लोकांनीं व्याजीं लाविल्यास आज जो जमिनीचा धारा भरावा लागत आहे तो परभारे बाहेर पडून जमीन मुफत वापरावयास सांपडेल.

इंग्लदांतील लोक सोन्याचे सामान्यतः डागिने करित नाहींत; तेथें सोन्याचें बहुतकरून नाणें पाडतात, त्यामुळें इंग्लदांत सोन्याचें नाणें विपुल अढळतें. हिंदुस्थानांत रेलवे बांधण्याकरितां इंग्लिश लोकांनीं १ अब्ज आणि ६० कोटि रुपये दिले आहेत; त्यांचे त्यांस पांच टक्के किंवा कांहीं कमी व्याज मिळतें. त्याबद्दल एंकदर ७ कोटि रुपये दरवर्षी इंग्लदांत जातात. आपल्या लोकांनीं डागडागिन्यांत पैसा न घालतां ह्या कामाकडेस पैसा लाविला असता, तर एवढी मोठी रक्कम दरवर्षी परदेशीं कां जाती ?

अगदीं लहानशी रक्कम घेऊन तिचे डागिने केले किंवा ती व्याजानें लाविली, तर काय फरक पडतो तो पहाः—

अ यानें १०० रुपये मागें टाकिले आहेत. तो ते सेव्हिंग ब्यांकेंत ठेवितो. त्यास फार थोडें व्याज मिळतें, तरी एक वर्षाचे ३८= रुपये त्याच्या पदरांत पडतात. ब हाहि १०० रुपये मागें टाकितो; परंतु त्यांचें पांच तोळे सोनें घेतो, व त्याचे डागिने घडविण्याकरितां दर तोळ्यास -॥- प्रमाणें २॥ रुपये देतो. वर्षअखेर अजवळ १०३८= रुपये होतात आणि बजवळ ९७॥रुपये होतात. वर्षअखेर अ ह्यास ५०रुपयांचें कारण पडल्यामुळें तो ब्यांकेंतून ते काढून खर्च करितो; त्याचे ब्यांकेंत ५३८= रुपये शिलक राहतात. ब यास ५० रुपयांचे कारण पडल्यामुळें तो आपल्या डागिन्यांवर ते कर्जाऊ काढतो; त्यांचें त्यास कमींत कमी ६ टक्क्यांप्रमाणें व्याज भरावें लागतें. दुसऱ्या वर्षाच्या अखेरीस अचे ब्यांकेंत ५४॥-॥ होतात. बचे ९७॥ रुपयांचे डागिने सावकाराच्या घरांत राहून त्यास ५३ रुपये कर्ज होतें. ह्याप्रमाणें १२ वर्षें गेलीं ह्मणजे बकडे सावकाराचे सुमारें ५३ रुपये व्याजाचे आणि ५० रुपये मुदलाचे मिळून १०३ रुपये व्याजमुद्दल होऊन गहाण ठेविलेले डागिने जातात; आणि

शिवाय त्यास ५॥ रुपये कर्ज होतें. ह्याच मुदतींत अनें व्यांकेंत एक पैसाहि टाकिला नाहीं, तरी त्याचे आपोआप सुमारें ७६ रुपये मुद्दल तयार होतें.

वर दाखविलेल्या तोट्याशिवाय डागिन्यांस चोराची भीति असते, ते वापरले असतां थोडे बहुत तरी झिजतात, आणि विकावयास गेलें असतां त्यांची कांहीं कमी किंमत येते. फार तर काय, पण पुष्कळ वेळां डागिन्यांसाठीं सोन्यासारखे जीवहि जातात. ह्याप्रमाणें अनेक तोटे होतात ते निराळेच. परंतु शेत पेरण्यास जसें बीं हवें, तसा पैसा कमाविण्यास भांडवल हवें; तें नाहींसें झाल्यानें फार तोटा होतो, त्याचा प्रथम विचार केला पाहिजे.

हल्लीं डागिन्यांत गुंतलेला ऐवज जर पुनः पैशाच्या रूपास आणून तो कर्ज फेडण्याकरितां, चांगलीं गुरेंढोरें आणि शेतीचीं आउतें घेण्याकरितां किंवा व्यापाराकरितां लाविला, तर ह्या हिंदुस्थानचें किती बरें कल्याण होईल !!

**३. आयापेक्षां खर्च जास्त. स्माइल्स** साहेब ह्मणतात कीं:—

"जो खऱ्या मनाचा मनुष्य आहे, तो वास्तविक आपली जी योग्यता "नाहीं ती आहे असें दाखविण्यास, अथवा आपल्याजवळ जो पैसा "आहे त्यापेक्षां श्रीमंतीचा डौल घालण्यास, अथवा आपल्या ऐप- "तीस योग्य नाहीं अशा रीतीनें राहण्यास संकोच करितो. तो आपल्या "आयाच्या आंत खर्च करून इमानेंइतबारें आपला संसार मोठ्या "हिंमतीनें चालवितो; दुसऱ्यांच्या प्राप्तीवर अधर्मानें निर्वाह करित नाहीं. "जो मनुष्य आपल्या ऐपतीबाहेर डामडौल करण्याकरितां कर्ज "काढितो, तो मनुष्य खरोखरी ह्मटलें तर दुसऱ्याचे उघड खिसे काप- "णाऱ्याप्रमाणेंच अधर्मी होय."

वरील टीका मुख्यत्वेंकरून शहरांत राहणाऱ्या सुशिक्षित लोकांपैकीं कित्येक वर्गाच्या लोकांस लागू आहे. आपल्या पूर्वजांप्रमाणें गरिबीनें संसार करण्यांत त्यांस संतोष वाटत नाहीं. मानमरातब मिळण्याकरितां डामडौल केला पाहिजे, असें त्यांस वाटतें. तो डामडौल करून दाखविण्याकरितां जेथून मिळेल तेथून ते कर्ज काढितात. परंतु हा भ्रमाचा भोपळा फार दिवस टिकत नाहीं; आणि मग स्पर्शजन्य रोग झालेल्या मनुष्यापासून सर्व लोक जसे दूर दूर राहतात, त्याप्रमाणें स्नेहीसंबंधी त्यांपासून दूर रहाण्याचा प्रयत्न करितात.

डामडौल करण्याची एकदा संवय लागली, ह्मणजे ती सोडून देण्यास फार कठीण जाते. प्रथम चांगलेसें धोतर घ्यावेंसें वाटतें; नंतर त्या धोतराजोगा अंगरखा करावा असें मनांत येतें; चांगल्या धोतरास आणि चांगल्या अंगरख्यास हलकेसें पागोटें चालत नाहीं; असा एकदा पोशाख बनला, ह्मणजे त्याचप्रमाणें नेहमी पोषाख करावा लागतो. त्याच्या अभावीं चैन पडत नाहींसें होतें. जवळ पैसा नसल्यामुळें असा पोशाख घेण्यास सामर्थ्य नसलें, तरी त्या सर्व पोशाखावांचून चालत नाहीं; यासाठीं प्रथम चांगलें धोतर घेण्याचें मनांत आलें, ह्मणजे त्यावेळींच आत्मासंयमन करावें. एका धोतराविषयीं उत्पन्न झालेल्या इच्छेचा प्रतिकार करण्यास इतकें कठीण जात नाहीं; पण तीच सर्व पोशाखाविषयीं झालेली संवय सोडून देण्यास फार कठीण जातें. एका धोतराविषयीं उत्पन्न झालेली लालसा दाबून टाकणें कठीण नाहीं; परंतु तिची तृप्ति करून तिच्यापासून पुढें जी संवय लागतें, ती पुरी पाडण्याकरितां खर्च करणें फार कठीण पडतें.

आभरणाचा खोटा ॥ धरिल्या अभिमान निश्चयें घात ।
जनरुचि बघण्यापूर्वी ॥ ग्रंथीला लावुनी पहा हात ॥ *

---

* Fond pride of dress is sure a very curse;
' Ere fancy you consult, consult your purse.

पुष्कळांच्या असें मनांत येतें कीं, जरा भारी कपडे घेतल्यानें किंवा जरा जास्ती भोजनखर्च केल्यानें, किंवा एकाद्या वेळीं मेजवानी नाहीं तर मजलस केल्यानें तें काय होणार आहे? . परंतु 'थेंबें थेंबें तळें सांचें,' * हें लक्षांत ठेविलें पाहिजे. मोठ्या खर्चापेक्षां लहानसहान खर्चास फार जपावें. मोठ्या खर्चानें होणारें नुकसान ताबडतोब लक्षांत येतें. लहानसहान बाबतींचे खर्च जाणवल्याशिवाय नुकसान करितात. मोठा ताप आला असतां त्यास मनुष्य ताबडतोब उपाय करितो. हाडीज्वर समजण्यांत न येऊन शेंवटीं दुर्धर क्षयाची भावना होते. 'चीर पडे आणि जहाज बुडे' ही ‡ ह्मण नीट लक्षांत ठेवावी.

**४. जामीन राहणें.** जामीन राहण्याचें टाळवेल तोंपर्यंत टाळित जावें. कित्येक प्रसंग असे येतात कीं, त्या वेळीं आपल्या स्नेह्यास मदत करणें हें आपलें कर्तव्य असतें. आपल्याजवळ त्यास देण्यापुरता पैसा असेल, व तो देण्याची आपली खुषी असेल, तर तो द्यावा; परंतु जी गोष्ट आपल्या हातून होण्यासारखी नाहीं, ती करण्याची कबूल करून तिच्यापासून ऋणग्रस्त होणें हें वाजवी नाहीं. दुसऱ्यास अविचारानें बेधडक जामीन राहून पुष्कळ लोकांनीं आपला स्वतःचा व आपल्या कुटुंबांचा सर्वस्वीं नाश करून घेतलेला आहे.

**५. अपात्रीं धर्म. हिंदुस्थानास** दारिद्र्य येण्याचीं जीं अनेक कारणें आहेत त्यांतील अपात्रीं धर्म हें एक कारण आहे. ह्याचे बरेच प्रकार आहेत.

ज्या लोकांस खरोखरी जरूर नाहीं, त्या लोकांस भिक्षा घालणें किंवा धर्म करणें, ही एक आपल्या लोकांतील रोज घडणाऱ्या चुक्यांपैकीं

* Many a little makes a mickle.

‡ A small leak will sink a great ship.

एक चुकी आहे. अपात्रीं धर्म केला असतां पाप घडतें, ह्मणून आपल्याच शास्त्रांत लिहिलें आहे, त्याचा कोणी विचार करित नाहींत. ह्या धर्मापासून आळसास आणि अनीतीस उत्तेजन दिल्याप्रमाणें होतें. त्याची सर्व जबाबदारी अंशतः प्रत्येक धर्म करणारावर किंवा भिक्षा घालणारावर येते. ह्याप्रमाणें धर्म करणारा पापास पात्र होऊन त्याच्या जवळचा संचय नाहींसा होतो. पैशापरी पैसा जाऊन पदरीं पाप येतें. पाहिजे त्यास दान देऊं लागल्यास मागणारे किती येतील, याचा कांहीं नेम आहे ? त्यांस देण्याकरितां **कुबेराचें** भांडार तरी पुरें पडेल ? आपला धंदा भिक्षेचा ह्मणून लिहून देणारे उघड भिकारी गेल्या खानेसुमारीप्रमाणें सुमारें १३ लक्ष होते. त्याशिवाय क्षेत्रोंक्षेत्रींचे किंवा दुसऱ्या ठिकाणचे लोक, जे आपल्या वृत्तीस भिक्षेचें नांव देत नाहींत, असे किती असतील तें सांगतां येत नाहीं. उदरनिर्वाहास दुसरा मार्ग नाहीं ह्मणून हे लोक भिक्षा मागतात असें नाहीं, तर आपला हा वडिलोपार्जित धंदा ह्मणून तो ते चालवितात. **तुकोबांनीं** ह्मटलें आहे कीं:—

**भिक्षापात्र अवलंबणें। जळो जिणें लाजिरवाणें॥**

त्याप्रमाणें भिक्षा मागणें हें लाजिरवाणें आहे, असें न समजतां आपली वडिलोपार्जित वृत्ति सोडून निथळत्या घामानें उदरनिर्वाह करावा हें मोठें संकट, व ही मोठी अपकीर्ति असें ते समजतात, आणि इमानेंइतबारें हाडांचीं काडें करून संचय करणारांच्या कोशांचें जळवाप्रमाणें शोषण करित असतात.

कामकाज करण्यासारखे आपले सोयरेधायरे यांस विनाकारण मदत दिल्यानें किंवा त्यांचा चरितार्थ चालविल्यानें पण हाच परिणाम होतो. आपला पैसा जातो इतकेंच नाहीं, तर आळसांत कालक्रमण करण्याची संवय त्यांस आपण लावून त्यांचेंहि अकल्याण करितों. प्रत्येक

श्रीमंताच्या घरीं सोयरेपणाचा हक्क दाखवून, किंवा हांजी हांजी करून यजमानयजमाननींस खुष करून अजगराप्रमाणें दिवस काढणारे किती लोक सांपडतील?

ह्या प्रकारच्या लोकांसाठीं जो खर्च होतो, त्याशिवाय नांव मिळविण्यासाठीं जे धर्म करितात, त्यामुळें शेंकडों लोकांचे कोशभांडार रिते झालेले आढळून येतात. एवढ्यासाठींच गुप्तदानाचें आपल्या धर्मानें महापुण्य मानिलें आहे.

वर सांगितल्याशिवाय मद्यपानाचें व्यसन, जुगाराचा नाद, उलाढाली, आळस वगैरे कर्ज होण्याचीं दुसरीं अनेक कारणें आहेत; परंतु त्यांचा येथें विचार करितां येत नाहीं.

### (३) कर्जापासून होणारे वाईट परिणाम.

कर्जापासून होणाऱ्या वाईट परिणामांपैकीं खालीं दिलेले कित्येक परिणाम होतः—

१. **पैशाचें नुकसानः**—सन १८८१ सालीं **हिंदुस्थानांत** २,२१,००० व्याजबट्टा करणारे लोक होते. ह्याशिवाय ज्यांनीं आपला हा धंदा उघड कबूल केला नसेल असे पुष्कळ लोक असतील. ह्यांस ऋणकऱ्यांनीं व्याजाचीं रक्कम किती बरें दिली असेल?

डागडागिने गहाण ठेविले असतां दरसाल सरासरी १२ टक्क्यांचें व्याज **हिंदुस्थानांत** पडतें. डाक्टर **हंटर** ह्मणतात कीं, "**हिंदुस्थानांत**तील प्रत्येक प्रांतांत व्याजीं लाविलेल्या भांडवलास व्याज काय पडतें, त्याचा तपास करण्याचें माझें काम होतें. त्याप्रमाणें तपास करितां कळून आलें आहे कीं, शेतकऱ्यास ज्या लहान लहान रकमा व्याजीं देण्यांत येतात

त्यांजबद्दल त्यांस ह्या देशांत पूर्वी जो ३७॥ टक्क्यांच्या व्याजाचा दर चालू होता, त्याप्रमाणें अद्यापि व्याज द्यावें लागतें.'

कित्येक गरीब लोकांस ज्या वेळीं महाण देण्याकरितां जवळ कांहीं नसतें, तेव्हां दर रुपयास दरमहा एक आणा व्याज द्यावें लागतें, ह्मणजे त्यास दरसाल दरशेंकडा ७५ रुपये व्याज द्यावें लागतें. असें व्याज जर सावकारास द्यावें लागतें, तर गरीबगुरिबांजवळ पैसा कोठून राहणार ! ज्या लोकांनीं आपला व्याजबट्टा करण्याचा धंदा आहे ह्मणून उघड रीतीनें कबूल केलें आहे, त्या लोकांचा चांगलाच धंदा चाललेला असेल, ह्यांत संशय नाहीं. त्यांत कित्येक तर मोठे लक्षाधीश असतील. परंतु सरासरी दरएकाची दर महिना ५० रुपये प्राप्ति असेल असें मानिलें, तरी २,२१,००० व्याजबट्टा करणारांस व्याजाप्रीत्यर्थ १,१०,५०,००० रुपये दरमहा, ह्मणजे १३,२६,००००० रुपये दरसाल मिळतात, असें दिसून येतें. ह्याचा अर्थ, इतके रुपये गरिबांच्या घरांतून निघून श्रीमंतांच्या घरांत ओतले जातात, असा होतो.

गरीब लोकांचे हे कोट्यावधि रुपये सावकारांच्या घरांत जातात, इतकेंच त्यांचें नुकसान होतें असें नाहीं. ह्या लोकांजवळ पैसा मुळींच शिल्लक राहत नसल्यामुळें त्यांस रोजचा संसार अथवा कोणताहि धंदा फायदेशीर पडत नाहीं. अशा मनुष्यास धंदा करावयास पैसे पाहिजे असल्यास इतर मनुष्यांपेक्षां त्याला व्याज जास्ती पडतें. जिन्नसपान्नस उधार घ्यावयाचा असला, ह्मणजे दुकानदार दिढी दुपटीपर्यंत किंमत घेतात. **हिंदुस्थानां**तील शेतकी दुर्दशेस येण्याचें मुख्य कारण, शेतकऱ्यांजवळ बिलकुल पैसा नसतो, हें आहे. हल्लीं नांगर वगैरें जीं आउतें अथवा ढोरें ते वापरतात, त्यांपेक्षां चांगलीं आउतें व मजबुत ढोरें ते वापरतील, तर शेतकीचें उत्पन्न पुष्कळ वाढेल.

२. **अपकीर्तिः**—ज्यास कोणाचें देणें नसतें, तो अर्धी भाकरी खाऊनहि आपल्या ठिकाणीं सुखी राहून कोणाचीहि मुरवत बाळगित नाहीं. वेळ आली तर पाहिजे त्याच्या तोंडीं लागण्यास त्याच्या अंगीं धैर्य असतें. परंतु ऋणकरी बहुतकरून सावकारास तोंडच दाखविण्यास भितो; कारण तो वेळच्या वेळीं पैसा परत न दिल्याबद्दल त्याची हमेशा निर्भत्सना करित असतो, व त्यास उघड रीतीनें शिव्याहि देण्यास भीत नाहीं. ऋणकऱ्यास केव्हां केव्हां लपूनहि रहावें लागतें, अथवा सावकाराच्या हातांत न सांपडण्यासाठीं ठिकठिकाणीं भटकावें लागतें. एकाद्या पदच्युत अथवा मानभ्रष्ट झालेल्या मनुष्याप्रमाणें तो दुसऱ्यास, व स्वतः त्याचा त्यास वाटूं लागतो. त्याचें सर्व आयुष्य पोकळ सबबी व युक्ति काढित बसण्यांत जातें, व समयास त्याचा शेंवटहि दिवाणी तुरुंगांत होतो.

३. **असत्य भाषणः**—ज्यास कर्ज झालेलें असतें, त्यास सत्य राखणें फार कठीण पडतें. एकापासून निघेल तितकें कर्ज काढिल्यानंतर दुसऱ्याजवळ साख राखण्यासाठीं मला कोणाचें देणें नाहीं, ह्मणून त्यास सांगावें लागतें. व्याजाची रक्कम अमुक दिवशीं आणि मुद्दलाची रक्कम अमुक दिवशीं भरीन, ह्मणून तो सावकारास कबुल करितो; परंतु तो दिवस आला ह्मणजे सावकारास देण्यासाठीं त्याच्याजवळ कांहीं नसतें. ह्याप्रमाणें तो दहावीस वेळां करार करितो आणि दहावीस वेळां तोडितो, ह्मणजे इतक्या वेळां तो असत्य भाषण करितो. ह्मण आहे कीं, ‘ कर्जाच्या पाठीवर खोट्याचा बोजा ’, * ती कांहीं खोटी नाहीं.

४. **आजन्म दास्य**—हल्लीं ह्मण पडली आहे कीं, एकदा मारवाड्याचें खातें सुरू झालें, म्हणजे तें कधीं पुरें व्हावयाचें नाहीं. ही

---

* Lying rides on debt's back.

ओरड मारवाड्याच्या नांवाची होऊन गेली आहे; परंतु ती बहुशां सर्व व्याजबट्टा करणारांस लागू आहे. ह्यांच्या व्याजाचे दर इतके सक्त असतात आणि हिशोबाची रीति इतकी भानगडीची असते कीं, ह्यांच्या पुऱ्या सपाट्यांत एकदा मनुष्य आला, म्हणजे तो त्या कचाटांतून जन्मभर सुटत नाहीं. ऋणकऱ्यानें आपले सर्व पैसे द्यावे आणि खातें पुरें करावें, असें सावकारांच्या कधींच मनांत येत नाहीं. त्यानें जन्मभर श्रम करून आपल्या ताब्यांत राहावें, अशी त्यांची इच्छा असते. गरीब शेतकऱ्याचें येईल तितकें पीक ते घेतात, आणि त्याचा वाटेल तो भाव धरून त्याची किंमत जमा करित असतात. त्यास खाण्यापुरतें मोठ्या मुष्किलीनें ते देतात. ह्याप्रमाणें वंशपरंपरेचे कित्येक कर्जबाजारी आहेत. **कोंकणांत** कुणबी व **गुजराथेंत** दुबळे वगैरे लोक लग्नाकरितां पांच पन्नास रुपये काढितात ते, आणि त्यांचीं बायकामुलें, जन्मपर्यंत सावकारांच्या घरीं मजुरीचें काम करित असतात. त्यांस खाण्यापुरतें धान्य आणि वर्षाचीं दोन वस्त्रें मात्र सावकारांकडून मिळतात.

९. **अप्रामाणिकपणा**:--कित्येक कारकून आणि गुमास्ते ह्यांच्याजवळ त्यांच्या धन्यांचा पैसा असतो, आणि त्याचा त्यांस तावडतोब हिशेब देण्याचा नसतो. जे उधळे आहेत त्यांस ह्या पैशाचा उपयोग करण्याची मोठी लालूच उत्पन्न होते. प्रथम ते थोडेसे पैसे घेतात आणि मागितल्याबरोबर परत देतात. दुसऱ्या खेपेस जरा मोठी रक्कम उचलतात आणि परत देण्यास थोडा वेळ लावितात. पुढें तो पैसा देण्याचें सामर्थ्य नाहींसें झालें, ह्मणजे हिशेबांत फिरवाफिरव करितात. शेंवटीं सर्व लबाडी बाहेर पडते, आणि त्यांजवर विश्वासघाताचा किंवा खोटा दस्तऐवज केल्याचा गुन्हा शाबीत होऊन त्यांस तुरुंगांत जावें लागतें. ह्याप्रमाणें चांगल्या स्थितींतील शिकलेले शहाणेसुरते कारकून, गुमास्ते कर्जबाजारी होऊन, सावकारानें निकड लाविली ह्मणजे अप्रामाणिकपणानें वागल्यामुळें, कैदेंत पडलेले प्रत्येक तुरुंगांत थोडेबहुत आढळून येतात.

६. **नीति आणि परमार्थ ह्यांची अनास्थाः**—जो ऋणग्रस्त होतो तो इतका त्रासलेला असतो कीं, आपलें लौकिक अथवा पारमार्थिक कर्तव्य काय आहे ह्याचा त्याच्या मनांत विचार सुद्धां येत नाहीं, आणि आपल्या नैतिक सुधारणेविषयीं तो कधींच प्रयत्न करित नाहीं. त्याच्या मनांत एकाद्या वेळीं सद्विचाराचा अंकुर उगवून जर दृष्टिगोचर होऊं लागला, तर शेतांतील निरुपयोगी निदनें ज्याप्रमाणें बालतरूची वाढ खुंटवून टाकितात, त्याप्रमाणें चिंता आणि क्लेश त्याची वाढ खुंटवून टाकितात. अर्थात् त्याच्या बुद्धीपासून कांहीं फलोत्पत्ति होईल अशी आशाच करावयास नको. केव्हां केव्हां ह्या चिंतांपासून होणाऱ्या यातनांचें दुःख असह्य झालें असतां मद्यप्राशनादि आरामाचे उपाय योजावेत असें मनुष्यांस वाटूं लागतें; आणि शेंवटीं शेंकडों ऋणग्रस्त छाकटे बनून मरण पावतात.

वर दाखविलेले परिणाम ऋण करितांना थोड्याच लोकांच्या मनांत येतात. हे सर्व मूर्तिमंत त्यांच्या डोळ्यासमोर उभे राहिले, तर कशाहि अडचणीच्या प्रसंगीं ते ऋणग्रस्त होणार नाहींत.

## (४) ऋणमुक्त होण्याचे इलाज.

'काय करावें, नाइलाजास्तव कर्ज काढावें लागलें, त्याबद्दल फार वाईट वाटतें.' असें ह्मणणारे पुष्कळ आहेत; परंतु इतक्यानें कांहीं भागत नाहीं. ह्याप्रमाणें शंभर वर्षें नुसता पश्चात्ताप केला, तरी त्यापासून कर्जांतला एक छदामसुद्धां कमी व्हावयाचा नाहीं. डोंगरावरून धोंडा खालीं ढकलून देणें फार सोपें आहे, परंतु तो वर चढविण्यास फार श्रम लागतात. त्याचप्रमाणें कर्ज करणें फार सोपें आहे, परंतु तें फेडणें फार कठीण जातें. तथापि योग्य इलाज केले असतां तें केवळ अशक्य नाहीं, आणि त्यापासून पुढें होणाऱ्या

गोड परिणामांनीं सर्व कष्टांचा मोबदला मिळाल्यासारखा होतो. खालीं लिहिलेले इलाज जो इमानें इतबारें करील, तो खास कर्जमुक्त होईल.

**१. आपलें उत्पन्न किती आणि कर्ज किती ह्यांचा बारकाईनें अदमास काढाः**—ज्यांस दरमहा ठरलेले पगार मिळतात, त्यांचें उत्पन्न किती हें नक्की समजूं शकतें. परंतु शेतकरी आणि व्यापारी ह्यांचें उत्पन्न कमीजास्ती होत असतें. त्यांनीं गेल्या कांहीं महिन्यांची किंवा वर्षांची सरासरी काढून आपलें महिन्याचें उत्पन्न ठरवावें. हें उत्पन्न ठरवितांना तें हिशेबानें जितकें येईल, त्यापेक्षां जरा कमीच धरून चालावें. जो पैसा पदरांत पडला आहे त्याच्या इतका खर्च करून चरितार्थ न चालवितां जो पैसा मिळविण्याचा त्यांचा इरादा असतो, त्याच्या इतका खर्च करून संसार कित्येक लोक करित असतात, आणि त्यामुळें वर्षानुवर्षें त्यास अधिकाधिक कर्ज होत असतें.

उत्पन्नाचा नक्की अदमास करून आपल्यास कर्ज किती आहे त्याचा नक्की आंकडा काढावा. कित्येक कर्जबाजारी लोक ह्याचा कधीं विचारच करित नाहींत. जिकडून रक्कम मिळेल, तिकडून ते काढित असतात, आणि शेंवटीं देणें किती झालें, तें त्यांचें त्यांस कळत नाहींसें होतें.

आपल्यास एकापेक्षां जास्ती सावकारांचें देणें असल्यास कोणाचा तगादा जास्ती आहे आणि कोणाचें व्याज जास्ती आहे, त्याचा विचार करून ठेवावा. ह्मणजे प्रथम त्याचा निकाल करण्यास ठीक पडतें.

ह्या गोष्टी फक्त मनांत बाळगून पुरे नाहींत. कोणती रक्कम कोणापासून काढिली, ती तारीखवार लिहून हिशेब तयार करावा, ह्मणजे दिवसेंदिवस कर्ज जास्त होत जात आहे, किंवा कमी होत जात आहे तें समजूं शकेल.

२. **तुह्मी आपला खर्च असा बेतावातावर आणा कीं, दरमहा व्याजाची सर्व रक्कम देऊन मुद्दलाची थोडी तरी फेड होत जाईलः**—उधळखोरास अथवा खर्चीक मनुष्यास असें करण्यास फार कठीण पडतें, परंतु ऋणमुक्त होण्यास ह्याशिवाय दुसरा इलाजच नाहीं. ह्यांत मोठ्या नडी येऊन कठीण वाटतें हें खरें आहे, परंतु ह्याप्रमाणें वागल्यास मनास मोठा आनंदहि होतो. समजा कीं, मनुष्य महापुरांत सांपडला आहे, त्या वेळीं त्यास हातपाय हालविण्यास कठीण जातात, परंतु जरा नेट धरून तो राहिला आणि पाणी कमी होऊं लागलें म्हणजे त्यास केवढा आनंद होत असेल! त्याचप्रमाणें ऋणरूपी महापुरांत बुडालेल्या मनुष्यास तें जसजसें कमी होत जाईल, तसतसा आनंद होत जाईल.

वर सांगितलेंच आहे कीं, दरमहा फक्त व्याजाची रक्कम देऊन पुरें नाहीं. फक्त व्याज भरित असूनहि मुद्दलाइतकी रक्कम कित्येक वेळां भरावी, तरी पुनः मुद्दल कायम तें कायमच राहतें. परंतु दरमहा थोडी तरी मुद्दलाची रक्कम भरित गेलें, तर हळू हळू कर्ज नाहींसें होईल. थोडें थोडें मुद्दल दर महिन्यास न फेडल्यास कर्जाची रक्कम जन्मपर्यंत तर काय परंतु अनेक पिढ्या गेल्या तरी नाहींशी व्हावयाची नाहीं.

समजा कीं, एक मनुष्यास ३० रुपये दरमहा असून २०० रुपये कर्ज आहे, आणि त्याचें त्यास दरसाल दरशेंकडा १२ टक्के किंवा दरमहा २ रुपये व्याज भरावें लागतें. या मनुष्यानें दरमहा २६ रुपयांत आपला चरितार्थ चालविण्याचा आणि ४ रुपये कर्जाच्या फेडीसाठीं काढून ठेविण्याचा निश्चय केला, तर काय परिणाम होतो तो पहा! दरमहाचा हिशोब दिला तर तो फार लांबेल, ह्यासाठीं वर्षावर्षाचा टोक हिशोब खालीं दिला आहे.

| | व्याज. | मुद्दलांतील फेड. | बाकी शिल्लक. |
|---|---|---|---|
| १ ल्या वर्षाच्या अखेर | २४ | २४ | १७६ |
| २ ऱ्या ,, ,, | २१ | २७ | १४९ |
| ३ ऱ्या ,, ,, | १८ | ३० | ११९ |
| ४ थ्या ,, ,, | १४ | ३४ | ८५ |
| ५ व्या ,, ,, | १० | ३८ | ४५ |
| ६ व्या ,, ,, | ५ | ४३ | २ |

पहिल्यापासून सगळें व्याज आणि कांहीं मुद्दल देण्यासाठीं दरमहा ४ रुपयेच काढून ठेविल्यानें दरमहा दर शेंकडा १ रुपयाचें व्याज असतांहि ६ वर्षांत २०० रुपयांची व्याजमुद्दलासकट फेड होते. दर वर्षाच्या अखेर व्याज कसें कमी होतें व मुद्दलाची फेड जास्ती जास्ती होऊन शिल्लक कशी कमी कमी होत जाते, तें वरील आंकड्यांवरून एकदम दृष्टोत्पत्तीस येईल. वरच्या हिशेबाप्रमाणें एकंदर ९२ रुपये व्याज देऊन मुद्दलाची फेड होते; तेंच फक्त व्याज देण्याचें ह्मटलें, तर ६ वर्षांत १४४ रुपये व्याजाचे जाऊन पुनः २०० रुपये मुद्दल कायमच्या कायम राहतें. ह्यासाठीं दरवर्षीं व्याजाचा निकाल करून मुद्दलांतली थोडी तरी रक्कम अवश्य दिलीच पाहिजे. ह्याच मनुष्यानें दरमहा रुपये ६ सावकारास देण्याकरितां निराळे काढले, तर एकंदर ५८ रुपये व्याजाचे देऊन तो ४ वर्षांच्या आंत कर्जमुक्त होतो.

**३. डागडागिने गहाण लावून कर्ज न काढितां बनेल तोंपर्यंत ते विकून टाकावे.**:— आपल्या बायकांस डागिने ह्मणजे केवळ जीवप्राण वाटतात. शेजारणीचा नवरा श्रीमंत असून तीस त्यानें जितके डागिने केले असतील, तितके डागिने आपल्यास असावेत, असें प्रत्येक बायकोस वाटतें. आपल्या काळजाचा तुकडा तोडून देण्यास त्या कबूल होतील, परंतु एक डागिना मोडूं देणार नाहींत. अशा अज्ञानांत जों-

पर्यंत आपल्या बायका दिवस काढित आहेत, तोंपर्यंत आपला संसार सुधारावयाचा नाहीं. ह्यासाठीं प्रथम त्यांची समजूत करून त्यांस आपली खरी स्थिति दाखवावी, ह्मणजे त्यांतील सगळ्या नाहींत पण कांहीं जणी तरी आपल्या नवऱ्यांस मदत करण्यास कबूल होतील. घरांत होणारा खर्च त्यांस सोंपावा, ह्मणजे संसाराची जोखम त्यांजवर पडून त्यांत येणाऱ्या अडचणी त्यांस दिसूं लागतील, व त्या दूर करण्याविषयीं त्यांस प्रयत्न करावा लागेल. आज एक डागिना मोडून कर्ज फेडिलें, तर व्याजाचा जो बचाव होईल त्यामुळें पुढें दोन डागिने करितां येतील, असें त्यांस दाखवावें. ह्याप्रमाणें प्रयत्न केला असतां ज्या कांहीं संमजस असतील, त्या आपलाच हट्ट धरून बसणार नाहींत. निदान थोड्याबहुत बायकांनीं ह्याप्रमाणें मदत केली असतां तितक्याच लोकांचा कर्जाचा बोजा कमी होईल.

**४. आपल्या उत्पन्नाचा बरोबर खर्च होईल, अशी तजवीज ठेवा**:— प्रत्येक सुधारलेल्या लहान मोठ्या राज्याचा जमाखर्चाचा अंदाज दरवर्षीं तयार करण्यांत येतो, त्यामुळें कोणत्या बाबतींपासून किती खर्च होतो, तें बरोबर समजूं शकतें. त्याचप्रमाणें प्रत्येक कुटुंबानें दरवर्षीं आपल्या आद्याचा आणि खर्चाचा अंदाज तयार करित जावा. खर्चाची निरनिराळीं खातीं किंवा बाबती पाडाव्या. अशा बाबती बहुतकरून घरभाडें, कर, भोजनखर्च, कपडाखर्च, मुलांच्या विद्याभ्यासाचा खर्च, लग्नकार्यादिकांचा खर्च, दानधर्म, किरकोळखर्च आणि संचय ह्या असतात. ज्यानें त्यानें आपल्या स्थितीप्रमाणें ह्यांत कमीजास्ती खातीं घालावींत. ह्यांतील शेंवटच्या दोन बाबतींबद्दल थोडें लिहिलें पाहिजे.

**किरकोळ खर्च**:— ह्या सदराखालीं दर महिन्यास कांहींना कांहीं नवा खर्च उभा राहतो. कोणी पाहुणा आला असतां त्यास मेजवानी द्यावी लागते. भांडें हरवलें तर नवें घ्यावें लागतें. धोतर कशास अटकून.

फाटलें तर तें बदलावें लागतें. ह्यासाठीं ह्या बाबतीकरितां जरा जास्ती रक्कम ठेवित जावी. परंतु ह्या बाबतीच्या खर्चावर फार बारीक नजर ठेवावी. कारण ह्या बाबतीचा खर्च दिवसेंदिवस वाढत असतो. दरेक वाढणारी बाबत फार क्षुल्लक असते, परंतु सर्व बाबतींमिळून मोठी रक्कम होते. 'थेंबें थेंबें तळें सांचें' अशी ह्मण पूर्वीं दिली आहे, ती चांगली लक्षांत ठेवावी.

संचयः—दूरदृष्टि आणि अविचारी ह्यांत भेद असा आहे कीं, एकजण पुढें येणाऱ्या जास्ती खर्चाची अगाऊ तयारी करून ठेवितो व दुसरा ठेवित नाहीं. पहिला दर महिन्यास पांच रुपये तरी मागें टाकितो. दुसरा मागें कांहीं टाकित नसल्यामुळें त्याच्याजवळ संचय होत नाहीं, आणि त्यामुळें कांहीं वेळानें त्यास कर्ज काढावें लागून ९ रुपये दरमहा व्याजाचे भरावे लागतात; ह्याप्रमाणें त्याचें दुहेरी नुकसान होतें.

मनुष्यास जोंपर्यंत कर्ज आहे तोंपर्यंत तें फेडून टाकण्याचा प्रयत्न करणें, हें त्याचें पहिलें कर्तव्य आहे. त्यांतून मुक्त झाल्याबरोबर त्यानें, आणि ज्यास कर्ज नाहीं त्यानें, संचय करण्यास लागलें पाहिजे. पहिला पैसा मागें टाकिला कीं, ह्या जगतांत पुढें पाऊल टाकिलें असें समजावें. पैसा मागें टाकून संचय करणें हें मनुष्याचें आत्मसंयमन, दूरदृष्टि, विवेक आणि शहाणपण, ह्यांचें उत्तम सूचक आहे. भावी सुखाचा समयास हाच अंकुर, आणि स्वातंत्र्याच्या इमारतीचा हाच पाया, असें ह्मटलें तरी चालेल. एकदां संचय करण्यास लागल्यावर महिन्याच्या उत्पन्नांतून कितवा हिस्सा मागें टाकावा, हें ज्यानें त्यानें आपल्या स्थितीचा विचार करून ठरवावें. एकाद्या तरुण मनुष्यास एक दोन मुलेंच असतील आणि पगार अथवा उत्पन्न मोठें असेल, तर दर-

महा निम्मे रक्कम मागें टाकण्यास हरकत नाहीं. पगार अथवा उत्पन्न लहान असल्यास तिसरा हिस्सा मागें टाकितां येईल. ज्याचें मोठें कुटुंब असेल, त्यास इतकी रक्कम मागें टाकितां येणार नाहीं; परंतु कोणत्याहि प्रसंगीं उत्पन्नापेक्षां खर्च मात्र जास्ती होतां कामा नये. ज्या रकमेचा संचय करण्यांत येईल, तिचे डागडागिने करूं नयेत, किंवा ती पुरून ठेवूं नये. ह्यापासून होणारें नुकसान पूर्वींच दाखविलें आहे. ती थोडी थोडी वाढत जावी, ह्यासाठीं कशी तरी व्याजीं लावावी, किंवा कांहीं व्यापारधंद्यांत घालावी. ज्या वेळेस खात्रीलायक कूळ न मिळेल, तेव्हां ती निदान सेव्हिंग ब्यांकेंत तरी ठेवावी. पैसा व्याजीं लावून ठेविण्याची लहानपणापासून संवय लावित जावी. मुलांस आईबापें वारंवार खाऊकरितां पैसा देतात त्याची त्यांनीं मिठाई आणून खाल्ली, म्हणजे एक तर त्यास खर्च करण्याची संवय लागते, दुसरें त्यांच्या शरीरप्रकृतीस इजा होते; पण तेंच दिलेला पैसा प्रथम पिशवींत ठेवून त्यांत दुसरा पैसा टाकिला म्हणजे दोन पैसे झाले असें त्यांस वाटतें, नंतर तीन पैसे कधीं होतील असें त्यांस होतें; ह्याप्रमाणें त्यांचे थोडेसे पैसे जमले, म्हणजे ते सेव्हिंग ब्यांकेंत ठेविल्यानें जास्ती कसे होतात, हें त्यांस दाखवावें. ही संवय त्यांस लहानपणापासून लागली, म्हणजे पुढें हमेशा संचय करण्याविषयीं त्यांची प्रवृत्ति होते. हीच संवय बायकांस लागल्यानेंहि फार फायदा होतो. ब्यांकबुकांत रक्कम किती झाली हें पाहून पुष्कळ बायकांस आनंद वाटूं लागतो, व त्या एक एक पैसा जमवून ब्यांकेंत ठेविण्यास देतात. ह्यापासून घरखर्च अल्पकष्टानें वेतावर येतो. जे वेडेवांकडे खर्च व्हावयाचे असतात, ते बायकांस नाखुष केल्याशिवाय सहज कमी होतात.

९. **जमाखर्च लिहित जा**:—एका प्रसिद्ध ग्रंथकाराचें म्हणणें असें आहे कीं, 'रोजच्या रोज बरोबर जमाखर्च ठेविल्यामुळें आपला सर्व व्यवहार नजरेसमोर येऊन मनुष्य जसा अटोक्यांत राहतो, तसा

दुसऱ्या कोणत्याच गोष्टीपासून राहत नाहीं'. पुष्कळ लोक वेळ मिळत नाहीं म्हणून सबब सांगतात. परंतु त्यांना वेळ नसतो, असें म्हणण्यापेक्षां त्यांना इच्छाच नसते, असें म्हटलें तरी चालेल. आपल्या देशांत आणि परदेशांत असे मोठमोठे पुष्कळ पुरुष होऊन गेले कीं, त्यांच्यावर कामाचा जेवढा बोजा होता, तेवढा दुसऱ्या कोणावरहि नसेल; परंतु ते मरेपर्यंत घरचा जमाखर्च स्वतः ठेवित असत. **जॉन वेलस्ली** ह्याच्याइतकें काम थोड्याच लोकांना करावें लागलें असेल, परंतु ८६ वर्षांचें वय झाल्यानंतर, ह्मणजे मरण्यापूर्वीं एकच वर्ष, कायतो त्यानें आपला जमाखर्च लिहिला नाहीं. **जॉर्ज वॉशिंग्तन**, अमेरिकेंतील **युनायटेड् स्टेट्स**चा प्रेसिडेन्ट असतांहि, आपला जमाखर्च रोज तपासित असे. **ड्यूक ऑफ वेलिंग्टन** पैनापै आली आणि गेली, तर टिपून ठेवित असे.

पुष्कळ गरीब स्थितींतील लोकांस वाटतें कीं, 'आपला आदा तो काय आणि खर्च तो काय! आपल्याला त्याचा हिशेब ठेवून काय करावयाचें आहे?' परंतु ही त्यांची मोठी चूक आहे. जितकी मनुष्याची गरिबी जास्ती, तितकी त्यास पैशाची अधिक काळजी घेतली पाहिजे; कारण बरोबर पैशाचा हिशेब ठेविल्याशिवाय त्याचा व्यय कसा झाला तें कळूं शकत नाहीं.

रोजचा जमाखर्च ठेवून महिन्याअखेर त्यावरून बाबतवारी काढित जावी, ह्मणजे कोणत्या बाबतींस खर्च किती झाला तो समजून त्यांत कमीजास्ती करण्याची जरूर दिसल्यास तसें करण्यास साधन मिळतें. तसेंच निरूपयोगी बाबतींसाठीं जास्ती खर्च होत असल्यास तो कमी करून दुसऱ्या उपयोगी कामासाठीं खर्च करण्यास ठीक पडतें.

**६. रोख पैसा देऊन सर्व जिनसा खरेदी करित जाः—** ज्या जिनसा खरेदी करण्यास आपल्याजवळ आज पैसा नाहीं, त्या उधार

खरेदी करण्याविषयीं इच्छा उत्पन्न होऊन दुकानदाराजवळ खातें ठेविणारे लोक पुष्कळ आहेत; परंतु ह्यापासून पुष्कळांचा सर्वस्वीं नाश झाला आहे. ज्या वेळेस हातांतून रोख पैसा सोडावयाचा असतो तेव्हां विकत घेण्याची जिन्नस खरोखरी घेतलीच पाहिजे किंवा कसें, ह्याबद्दल बरोबर विचार मनांत येतो; परंतु खात्यावर जिन्नस घ्यावयाची तिचा पैसा कित्येक दिवसांनीं द्यावयाचा असतो, ह्मणून त्याबद्दल एकदम भीति वाटत नाहीं. उधार जिनसा घ्यावयाच्या त्या ज्याच्याकडे खातें असतें, त्याजकडूनच घ्याव्या लागतात, त्यामुळें चार दुकानांत तपास करावयास सांपडत नाहीं. ठरींव दुकानदार जो भाव सांगेल व ज्या जिनसा देईल त्या भावानें त्या घ्याव्या लागतात; त्या सर्वांत चांगल्या आणि स्वस्त्या अशा ज्या ठिकाणीं मिळतील, त्या ठिकाणच्या घेण्यास सांपडत नाहींत. ह्याशिवाय उधार जिनसा देणारा दुकानदार त्यांच्या किंमतीवर व्याजाची रक्कम चढवून ती किंमत आपल्या नांवें खात्यांत लिहित असतो; कारण त्याच्या पैशास त्यास व्याज पडत असतें. ह्याप्रमाणें उधार जिनसा घेतल्यानें, सावकाराकडून रोख कर्ज न काढिलें तरी तें अन्यरूपानें दुकानदाराजवळून काढिल्याप्रमाणें होतें.

**७. जिनसेची किंमत आणि गुण हीं दोन्हीं पाहून ती घेत जाः—** ज्या धोतराच्या जोडीस ३ रुपये पडून ती एक वर्ष टिकते ती जोडी, २ रुपये पडून सहा महिने टिकणाऱ्या जोडीपेक्षां एकंदरीनें फायदेशीर पडते, हें नीट लक्षांत ठेवावें. घाणेरड्या घरास थोडें भाडें देण्यापेक्षां स्वच्छ आणि निरोगी घरास जास्ती भाडें पडल्यास तें देणें बरें; कारण अशा घरांत राहिल्यानें पुढें औषधपाण्याचा खर्च न येतां आयुष्य वाढतें.

८. **लिलावांच्या आणि जत्रांच्या ठिकाणीं जाऊं नका; गेलांतच तर निदान बरोबर पैसे नेऊं नकाः**— लिलावांच्या ठिकाणीं गेलें असतां, ज्या वस्तूंची आपल्यास जरूर नाहीं, त्या वस्तु स्वस्त्या मिळतात एवढ्याच कारणानें त्या घेण्याची इच्छा उत्पन्न होते. परंतु ज्या वस्तूची आपल्यास जरूर नाहीं तीस कितीहि थोडी किंमत पडली, तरी ती स्वस्ती मिळाली असें समजूं नये. जत्रा पाहण्यास गेलें, ह्मणजे चित्रविचित्र जिनसा दृष्टीस पडून त्यांची जरूर नसतांहि त्या घेण्याची इच्छा उत्पन्न होते. ज्या वेळीं एकादी जिन्नस घेण्याची इच्छा उत्पन्न होते, त्या वेळीं 'ही घेण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे काय?' असा प्रश्न आपण आपल्यास न विचारितां 'ही घेतल्याशिवाय माझें चालेल किंवा नाहीं?' असा प्रश्न विचारावा. ह्मण आहे कीं, 'आज जरूर नाहीं तें रांधाल, तर उद्यां खाण्याचा पडेल वांधा.'

९. **'नाहीं' ह्मणण्यास शिकाः**— योग्य वेळीं 'नाहीं' ह्मणून ह्मणणें हें मनुष्याच्या स्वस्थतेस आणि कल्याणास फार अवश्य आहे, असें एका इंग्रजी ग्रंथकाराचें ह्मणणें आहे. योग्य वेळीं 'नाहीं' न ह्मणवल्यामुळें, किंवा न ह्मटल्यामुळें, पुष्कळांचा नाश झालेला आहे, असें तो ग्रंथकार ह्मणतो. जी वस्तु घेण्यानें आपल्या अंगीं सामर्थ्य नाहीं, ती घेण्याची इच्छा झाली असतां एकदम म्हणा कीं, 'नाहीं.' कर्जाची फेड करित असतां, कांहीं कारणानें हप्ता न भरावा अशी इच्छा उत्पन्न होतांच एकदम म्हणा कीं, 'नाहीं.' विनाकारण पोकळ डामडौल करण्यासाठीं पैसा उडविण्याविषयीं कोणी आग्रह करील, तर एकदम म्हणा कीं, 'नाहीं.' कांहीं दुर्वर्तनाविषयीं प्रसंगोपात मनाची प्रवृत्ति होईल, तेव्हां मनाचा धिःकार करून मोठ्या हिंमतीनें म्हणा कीं, 'नाहीं.' आळसाविषयीं, स्वसुखलोलुपतेविषयीं, मूर्खपणाविषयीं किंवा वाईट रीतीभातींविषयीं केव्हांहि मनाची प्रवृत्ति झाली

असतां, तिचा प्रतिकार करण्यासाठीं साफ ‘ नाहीं ’ ह्या रोषदर्शक शब्दाचा उपयोग करा. ह्या ‘ नाहीं ’ चा प्रथम उपयोग करण्यास जरा कठीण वाटेल, पण ‘ संवईनें शक्ति येते,* ’ हें लक्षांत ठेविलें पाहिजे. ह्या ‘ नाहीं ’ चा उपयोग करण्याचें लोकांच्या अंगीं नीतिधैर्य नसल्यामुळें पैशाचा दुर्व्यय होऊन कर्जाचा बोजा वाढत आहे. केवळ पैशाचा संचय करण्यासाठींच नव्हे, तर योजिलेलें कोणतेंहि सत्कृत्य पार पाडण्यासाठीं आत्मनिग्रहाची फार आवश्यकता असते.

## ( ५ ) ऋणमुक्त असल्यापासून फायदे.

वर केलेल्या विवेचनाचा उद्देश, मनुष्यानें पैशाची हाव धरून तो मिळेल तसा गोळा करित असावा आणि त्याचा स्वतःस अथवा दुसऱ्यास उपयोग होऊं देऊं नये, असा नाहीं; तर तो नीतीनें मिळवून त्याचा अवश्य त्याप्रमाणें व्यय करून योग्य संचय करावा, व कर्जाच्या जोखिमेंत पडूं नये, असा आहे. ऋणमुक्त असल्यापासून जे फायदे होतात, त्यांतील मुख्यमुख्य खालीं दिले आहेत.

१. **पैशाचा संचयः**—निथळत्या घामानें मिळविलेला पैसा सावकारांच्या घरांत कसा जातो, तें वर दाखविलेंच आहे. ऋणमुक्त मनुष्याचा ह्यापासून बचाव होतो.

२. **चित्ताची स्वस्थताः**—ऋणग्रस्त मनुष्यास करारामप्रमाणें देण्याकरितां जवळ पैसा नसल्यानें रात्रीं निर्घोर झोंप कधीं येत नाहीं. ऋणमुक्त मनुष्याच्या निद्रासुखांत कधीं अंतर पडत नाहीं.

३. **ऋणमुक्त मनुष्याचें साल्हाद स्वागतः**—ज्या मनुष्यांशीं कामाकाजाचा किंवा देवघेवीचा संबंध असतो, तीं मनुष्यें ऋणग्रस्त

* Strength grows with use.

मनुष्याचा त्रास करित असतात. त्याच्या सावकाराच्या कपाळास त्यास पाहिल्याबरोबर आढी पडते. त्याचे अपमानकारक शब्द त्यास नेहमीं सोसावे लागतात. ऋणमुक्त मनुष्य जेथें जाईल तेथें त्याचें साल्हाद अंतःकरणानें आणि सुप्रसन्न मुद्रेनें स्वागत होत असतें.

**४. सत्य आणि प्रामाणिकपणा ह्यांचा पुरस्कारः**—ऋणग्रस्त मनुष्य जे करार पुरे करितां येणार नाहींत, ते करित असतो; खोटीं वचनें देतो; ज्याची किंमत देण्याचें सामर्थ्य नाहीं, असा माल अप्रामाणिकपणानें खरेदी करित असतो. ह्याप्रमाणें असत्यास आणि दगलबाजीस त्याच्याकडून उत्तेजन मिळतें. ऋणमुक्त मनुष्याच्या हातून हे दोष घडत नाहींत.

**५. गरिबास मदत करण्याचें आणि सत्कृत्य करण्याचें सामर्थ्यः**—दुसऱ्यास सुख देणें किंवा दुसऱ्याच्या सुखाची वृद्धि करणें, हें ह्या जगांतील मोठें आत्मसुख आहे. परंतु जें आपलें नाहीं, तें दुसऱ्यास धर्मादाखल देखील देण्याचा आपल्यास अधिकार नाहीं. दानशील होण्यापूर्वी न्यायशील असलें पाहिजे. ऋणमुक्त मनुष्यास सावकाराचें घर भरावयाचें नसतें, त्यामुळें सत्कृत्यास हात लावण्यास त्याच्याजवळ दोन पैसे अधिक राहूं शकतात.

**६. कुटुंबसुख आणि मुलांस सन्मार्गदर्शनः**—ऋणग्रस्त मनुष्याच्या कुटुंबांतील विपत्तीचें पूर्वीच वर्णन केलें आहे. त्याच्या घरांत सुख तें काय हें मुळींच माहीत नसतें, इतकेंच येथें सांगणें बस आहे. उधळखोर आईबापांचीं मुलें उधळखोर होतात. काटकसरीची संवय आईबापांपासून मुलांस प्राप्त होते. पैशाच्या कामांत जो दूरदृष्टीनें वागतो त्याच्या वर्तनाचें फळ त्यासच मिळतें असें नाहीं, तर पुढील पिढ्यांचेंहि तो कल्याण करून ठेवितो.